मराठींतील पहिलाच लघुतम-कथासंग्रह

# नवी पालवी



प्रो. भा. म. गोरे, एम्. ए.
(काळे)
फर्ग्युसन कॉलेज पुणें.

—मुद्रक व प्रकाशक—
शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस, १०२६, सदाशिव पेठ, पुणें.

माझे

# पूज्य पितामह

## कै० नारायण शिवराम गोऱ्हे

यांच्या स्मृतीस

– अर्पण –

माता-तात-विना जगांत उरतां स्नेहें स्वयं वाढवी ।
गीर्वाणाङ्ग्ल-मऱ्हाट-गुर्जर तशा शिक्षेस दे हिंदवी ॥
विद्या, वाङ्मय, धर्मतत्त्व रुचिरा प्रीती हृदीं पालवी ।
त्यांतें अर्पियली कृतज्ञ हृदयें प्रेमें " नवी पालवी. "

— भालचंद्र. —

# अनुक्रमणिका


१ प्रास्ताविक—कथावाङ्मयांतील नवें दालन. ... ...

२ सांगावयाचें राहिलेंच. ... ... ...

१ ही कोण ? ... ... ...

२ आंबे—मोहर. ... ... ...

३ जुना बाजार. ... ... ...

४ गोरी सवत. ... ... ...

५ आनंदी प्राणी. ... ... ...

६ कोंबडा. ... ... ...

७ नास्तिक ! ... ... ...

८ 'इसू हात दे !' ... ... ...

९ बेबी. ... ... ...

१० हिरवी माडी. ... ... ...

११ बारसें. ... ... ...

१२ मुंबईचा दंगा ... ... ...

१३ आठवणीची अंगठी ... ... ...

१४ चित्रकाराचें रहस्य. ... ... ...

१५ अहिंसेचा बळी. ... ... ...

१६ चांदीची वाटी. ... ... ...

१७ ' प्रीतिची तऱ्हा.' ... ... ...

१८ स्त्री जात तेवढी....? ... ... ...

१९ आशा निराशा ... ... ...

२० विस्कटलेला संसार. ... ... ...

२१ गायिका. ... ... ...

२२ " जिंदगी " ... ... ...

# सांगावयाचें राहिलेंच !



“ सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः—”

—श्रीमद्भगवद्गीता.

प्रस्तुत लेखकाची पहिली लघुतम-कथा मुंबईच्या ‘नवा मनु’ या साप्ताहिकांत ता. २१ जुलै १९३६ रोजीं प्रसिद्ध झाली. “ कृतज्ञता ” हें तिचें शीर्षक असून थोडा फरक करून ‘आठवणीची अंगठी’ या नांवानें ती या संग्रहांत समाविष्ट केली आहे. प्रारंभीं लिहिलेल्या दोन कथा—वर निर्दिष्ट केलेली कथा, व ‘कोंबडा’ही रूपकात्मक-कथा—घडणीच्या दृष्टीनें अगदीं स्वतंत्र असल्या तरी त्यांची बीजरूपाची कल्पना इंग्रजीवरून घेतलेली होती. पुढील कथा अर्थात् स्वतंत्र आहेत. वर उद्धृत केलेलें वचन प्रमाण मानूनच हा संग्रह जनतेपुढें ठेविलेला आहे

**टीकाकारांनींही या वचनाचें स्मरण ठेवूनच लिहावें अशी त्यांना विनंति आहे.** असो.

प्रस्तुत छोटा संग्रह प्रसिद्ध करण्यांत पुढाकार घेतल्याबद्दल मॅ. चित्रशाळा प्रेस पुणें यांचा लेखक अत्यंत आभारी आहे. फर्ग्युसन कॉलेजांतील इंग्रजी शाखेचे प्रमुख अध्यापक, ‘वार्ताविहार’ व ‘योगायोग’ या प्रसिद्ध नाटकांचे कर्ते, प्रो. के. गो. पंडित, एम्. ए, ‘ध्रुव’ मासिकाचे कार्यक्षम संपादक, माझे मित्र श्री. रा. प्र. कानिटकर एम्. ए, कुशल-कथा-लेखक व टीकाकार श्री.नी. गो. पंडितराव. बी. ए. ( ऑनर्स ) यांनीं वेळोवेळीं तंत्रात्मक चर्चा करून लेखनास उत्तेजन दिल्याबद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा अत्यंत आभारी आहे.

फर्ग्युसन कॉलेज.

पुणें. नं. २ — भा. म. गोरे.

# कथावाङ्मयांतील नवें दालन



' अल्पाक्षररमणीयं यः कथयति निश्चितः स खलु वाग्मी ' ॥

' Brevity is the soul of wit. '

लांडा झगा, विखुरलेल्या बटा, अर्धस्फुट बोबडे बोल, हट्टी छंदी स्वभाव अशा स्वरूपाची छोटी अवखळ पोर पाहूनहि, आणखी दहा वर्षांत हिच्याच तोंडावर तारुण्याला तजेला येऊन, नीटनेटक्या आकर्षक वेषभूषेनें, रेखीव बांध्यानें, लाडीक बोलानें आणि रूपलावण्यानें ती पहाणाऱ्याला वेड लावील असें भाविष्य करणें जरा दीर्घदर्शी असलें तरी अशक्यप्राय खास नाहीं. या कथाप्रकाराबद्दल आम्हीं असेंच म्हटलें तर !

इंग्रजींतील लघुकथा हा प्रकार पो आणि मोपांसा या अमेरिकन व फ्रेंच लेखकांच्या परिश्रमानें स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण झाला असला, तर लघुतम–कथा ( Short-Short-Story ) हा लेखनप्रकार मुख्यतः अमेरिकन वाङ्मयाचीच पैदास आहे.

आपल्याकडील बरेच वाङ्मयीन प्रकार व टीकात्मक विचार आपण इंग्लंडमधील वाङ्मयावरून उचललेले असल्यानें या नवीन अमेरिकन कथा–प्रकाराकडे आपलें जावें तितकें लक्ष्य गेलें नसल्यास नवल नाहीं. मात्र ' लिबर्टी ' किंवा ' कॉलियर्स ' यांसारखीं अमेरिकन व ' पासिंग शो ' सारखीं इंग्लिश मासिकें चाळणाऱ्यांना या कथा–प्रकाराची तिकडील असामान्य लोकप्रियता लक्ष्यांत आली असेलच.

आजच्या धकाधकीच्या मामल्यांत दीर्घसूत्री वाङ्मयापेक्षां छोट्या, मनोरंजक, मेंदूस फारसा शीण न देणाऱ्या वाङ्मयप्रकाराकडे वाचकांचा अधिकाधिक कल झुकत चालला आहे. अर्थात् इकडील परिस्थितीपेक्षां अमेरिकेंत हा प्रकार फारच अधिक प्रमाणांत आहे, व अशा वाङ्मयाला अत्यंत वाढती मागणी आहे. पांच मिनिटांत वाचून संपेल अशा, ( Five minute story ) परंतु स्वतंत्र, स्वयंपूर्ण, व कलायुक्त अशा लघुतम–कथेचा जन्म या प्रकारें विसाव्या शतकांतील विशिष्ट बौद्धिक व सामाजिक गरजेपासून झालेला आहे.

## मराठींतील पूर्वपिठिका

१ फेब्रुवारी १९३५ च्या प्रतिभा मासिकाच्या अंकांत श्री. वा. ना. देशपांडे यांनीं ' लघुकथेचा एक नवा प्रकार ' या छोट्याशा लेखांत ' जवळ जवळ ' अशा पद्धतीच्या कथाप्रकाराकडे वाचकांचें लक्ष्य वेधलें होतें, व प्रतिभेच्या विशेषांकांत ( १९३६ ) अशा प्रकारच्या छोट्या कथांकरितां बक्षीस लावून आलेल्या कांहीं कथा देण्यांत आल्या होत्या. श्री. वि. स. खांडेकर यांनींहि आपल्या ' विद्युत्प्रकाश ' या लघुकथा–संग्रहांत वरील पद्धतीच्या कांहीं काव्यमय कथा ' तृणांकुर ' या सदराखालीं दिल्या आहेत.

वर या कथाप्रकाराला उद्देशून आम्ही ' जवळ जवळ अशा पद्धतीच्या ' असें म्हटलें आहे, कारण कीं त्यांच्या लेखांत त्यांना आम्ही निर्देशिलेला ' लघुतम–कथा ' ( Short-Short-Story ) हाच प्रकार दाखवावयाचा होता असें वाटत नाहीं. " दहापांच वाक्यांपलीकडे कथेचा प्रकार वाढूंच नये " असा त्यांनीं स्पष्ट निर्बंध घालून दिला आहे. " व्यंजना, रूपक, प्रतीक, भावनामयता वगैरे काव्यगुणांचा उपयोग या लघु कथाप्रकारांत करण्यांत येतो, त्यामुळें गद्यकाव्याचाहि त्याला रंग चढतो असें त्याचें वैशिष्ट्य आहे " असें ते म्हणतात. तंत्राबद्दल त्यांनीं कांहीं उल्लेख केलेला नाहीं. पुढें दिलेल्या लघुतम कथेच्या तंत्रात्मक माहितीवरून श्री. देशपांडे यांनीं निर्देशिलेल्या प्रकारापेक्षां त्यांचें भिन्नत्व दिसून येईलच.

सामान्यतः लघुतमकथेचा विस्तार पांचशें शब्दांपर्यंत असतो. लघुकथेप्रमाणें--एक व्यक्ति, एक प्रसंग या बाबी यांतहि आहेतच, मात्र ' नवाङ्गनानां नव एव पंथाः ' या सुभाषिताप्रमाणें इतर सर्व लघुकथा-प्रकारांहून या वाङ्मयीन प्रकाराचें एक स्वतंत्र वैशिष्ट्य आहे, व त्या-योगानें हा प्रकार इतर कोणत्याहि प्रकाराहून भिन्न व ओळखूं येणारा असा होतो. तें वैशिष्ट्य म्हणजे कथाभागाच्या शेवटीं येणारी जबरदस्त कलाटणी.

कथा वाचीत शेवटपर्यंत येईपावेतों या अचानक प्रसंगाची वाचकाला जाणिव होतां कामा नये, व या कलाटणीनें कथेचें सर्व स्वरूप व वातावरण एकदम बदलून गेलें पाहिजे. या दोन गोष्टींतच लघुतमकथा--लेखकाचें सारें कौशल्य दिसून येतें, व या यशापयशावर त्या कथेचा परिणामकारकपणा अवलंबून रहाणार !

अशा प्रकारें लघुकथेचे सर्व गुण या प्रकारांत कायम ठेवून, लांबी व शेवटची कलाटणी किंवा अखेरी साधणें हें वैशिष्ट्य लक्षांत ठेवल्यास इतर कोणत्याहि कथाप्रकारांशीं गोंधळ होणार नाहीं. लघुकथा ( Short Story ) या इंग्रजी कथा--प्रकारापेक्षांहि ' conte ' या फ्रेंच कथा-प्रकाराशीं या नव्या प्रकाराचें अधिक साम्य आहे.

लघुतम--कथेकरितां विषय निवडतांना फक्त एक गोष्ट लक्ष्यांत ठेवली पाहिजे. ज्यांत कांहींहि बदल होत नाहीं, अशा स्थितीचें शब्दचित्र किंवा भावचित्र--मग तें कितीहि कुशलतेनें रेखाटलेलें असो--लघुतमकथेच्या दृष्टीनें निरुपयोगी आहे. मात्र कांहीं तरी अनपेक्षित शेवट होऊं शकणारे विषय व प्रसंग यांवर लघुतम कथांची चांगली उभारणी होऊं शकते.

एखाद्या कार्याचा अनपेक्षित परिणाम, ' केलें तुका, झालें माका ' अशी परिस्थिति, आपली समजूत एक प्रकारची असतां अचानक दिसलेली उलट परिस्थिति, ध्येय आणि वस्तुस्थिति, अपेक्षा आणि सत्यस्थिति, यांचीं द्वंद्वें, वगैरे विषय लघुतमकथांत चांगले उठून दिसतात. तरीहि " न खलु धीमतां कश्चिदविषयो नाम " असें कालिदासानें म्हटल्याप्रमाणें कोणताहि आटोपशीर व आकर्षक विषय घेऊन तो कुशल कथालेखकाला यशस्वी करून दाखवितां येईल.

## लघुतम-कथेचे तांत्रिक विशेष.

लघुतम-कथेची तांत्रिक उत्क्रांति एका अमेरिकन टीकाकारानें पुढील-प्रमाणें दिली आहे:—

" ... Characters involved in dramatic situation will react, and you have action. Such reaction produces complication and precipitates a crisis before the final climax " *

शेवटच्या अनपेक्षित कलाटणीचा उल्लेख वर आलाच आहे. याशिवायहि तंत्रदृष्ट्या या प्रकारचा आणखी एक विशेष सांगतां येईल. लघुकथेंत नाट्याप्रमाणें आदि, मध्य आणि अंत हे बहुधा निरनिराळे आणि स्पष्ट भाग असतात. मध्य म्हणजेच परमोच्च भावनोत्कटतेचा मध्यबिंदु. यानंतर सर्व गुंतागुंतीचा उकल होत जाऊन भावनेचा ताण कमी होत जातो, आणि योग्य शेवट ( Catastrophe ) साधून गोष्टीचा समारोप केला जातो. लघुतम-कथेंत मात्र बहुधा या तिसऱ्या भागाला अजिबात फांटा दिला जातो. जो परिणामकारक मध्य तोच अंत. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे लघुकथा अथवा नाट्याप्रमाणें गुंतागुंत उकलीत न बसतां, कलाटणीच्या तीक्ष्ण शस्त्रानें ती साफ छेदून टाकूनच परिणाम-कारक व अनपेक्षित रीतीनेंच कथा संपविलेली असते.

जीवनाचें संपूर्ण चित्र म्हणून नाटक किंवा कादंबरीकडे बोट दाखवितां येईल तसा प्रकार प्रत्यक्ष लघुकथेचाही होऊं शकत नाहीं; मग लघुतम-कथेच्या बाबतींत तसा हेका धरणें अप्रयोजकपणाचें होईल. " नैकत्र सर्वो गुणसन्निपातः " हें वचन प्रसिद्धच आहे. मानवी जीविताचें क्षणाचित्र म्हणूनच त्याची किंमत. काळोख्या रात्रींत वीज लक्कन् चमकून जाते, परंतु त्या क्षणांतच दिसलेल्या दृश्यानें केव्हां केव्हां इतका परिणाम होतो कीं अंधारलेल्या दुर्दिनांत तासन् तास टक लावून पाहूनहि तो होणार नाहीं. असो.

---

* ' The Short-Short-Story '—Houghton Miflin—New York

जुन्या अलंकारशास्त्राच्या दृष्टीनें या नव्या प्रकाराकडे पाहिलें असतां कळून येतें कीं, रूपक, अन्योक्ति वगैरे अलंकारांबरोबरच ' छेकापन्हुति ' या अलंकाराचा उपयोग मात्र या लघुतम–कथेंत फार मार्मिकपणें करून घेतां येतो. रामजोशांची—

" राधासखि–संवादे छेकापन्हुति आयका ।
रसिकहो चतुर किती बायका ॥ १ ॥ "

ही छेकापन्हुति सर्व रसिकांनीं वाचली असेलच. प्रत्येक वाक्य एका अर्थानें घेऊन नंतर त्याचा दुसराच अर्थ दाखविणें, यांतच या अलंकाराची चतुराई आहे. द्व्यर्थी ' शृंगारवैराग्य–तरंगिणी ', ' हरिहर ' ' रामकृष्ण–काव्य ' वगैरे काव्येंही संस्कृतांत आहेत. मात्र यांतील द्व्यर्थी आवेश बहुधा एका पद्यखंडांतच टिकतो. लघुतम–कथेंत हा अलंकार वापरतांना त्या मजकुराचा दुसरा अर्थ होऊं शकेल, अशी कल्पनाहि कथेच्या शेवटच्या भागापर्यंत वाचकाला येतां कामा नये. हा गौप्यस्फोट शेवटच्या दोन तीन वाक्यांत होतो, व अनपेक्षित कलाटणीनंतर वाचक जरा गोंधळून त्या दुसऱ्या अर्थावर नजर ठेवून ती कथा पुन्हां वाचूं लागतो. दुसऱ्या वाचनांत दोन्ही अर्थांना लागू पडतील, असे शब्द व वर्णनें पाहून जी मौज वाटते त्यांत या अलंकारात्मक लघुतम–कथेचें सार्थक आहे.

' पासिंग शो ' या इंग्रजी नियतकालिकांत अशा अनेक कथा असतात.

छेकापन्हुतीप्रमाणें ' विरोधाभास ' हा अलंकार या प्रकारांत वारंवार वापरला जातो, किंबहुना एखादी विरोधी परिस्थिति ही या प्रकाराची बैठकच आहे असें म्हणतां येईल. थॉमस हार्डीचा आवडता प्रकार ' Irony ' याचाहि समावेश अशा विरोधाभासांत करतां येईल.

अल्पाक्षररमणीयत्व व सूचकता हे दोन गुण या कथाप्रकारांत फार खुलून दिसतात.

लघुतम–कथेचें तंत्र संभाळून लिहूं इच्छिणाऱ्या लेखकांना आमची विनंतिवजा सूचना हीच कीं, इतर कथाप्रकारांशीं संकर न होईल अशा रीतीनें या कथा लिहिण्याची काळजी लेखकांनीं घेतली पाहिजे. सुनीताच्या चौदा ओळीच्या संकेताप्रमाणें या प्रकाराचें लांबीचें बंधन पाळलें

जावें. तंत्राचा बडेजाव आम्ही करूं इच्छित नाहीं, तथापि आकर्षक गतिमान् आरंभ, आणि परमोच्च भावनाबिंदूवरच लकन् तारा तुटावा असा अनपेक्षित शेवट, या गोष्टींकडे लक्ष्य दिलें जावें असें आम्हांला वाटतें.

विरोध व विरोधाभासावरच लघुतम–कथेची मुख्यतः उभारणी असल्यानें ही कथा शंभर टक्के विनोदी अशीही होऊं शकेल; परंतु केवळ चार ओळींचा चुटका ओढूनताणून लघुतम–कथेच्या चौकटींत बसविण्याचा मोह मात्र टाळला पाहिजे. जेरोम–के–जेरोम या आंग्ल विनोदी लेखकाचा हा लांबण लावलेल्या चुटक्याचा हा प्रकार हवा तर पहावा. त्याचप्रमाणें विशेष कथाभाग किंवा पेंचप्रसंग नसूनहि केवळ काव्यमय शब्दचित्र किंवा भावचित्र रेखाटून त्यालाच 'लघुकथा' हें नांव देण्याची हल्लींची प्रवृत्ति पुढेंमागें या नवीन प्रकारांतहि न शिरेल अशी काळजी पुढील लेखकांनीं घेणें जरूर आहे.

छोटी कादंबरी म्हणजे लघुकथा नव्हे. छोटें नाटक म्हणजे एकांकिका ( Oneact–Play ) नव्हे, छोटें खंडकाव्य म्हणजे भावगीत नव्हे, त्याप्रमाणें केवळ छोटी लघुकथा म्हणजे लघुतम–कथा नव्हे हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. लांबीचा प्रश्न असलाच तरी तंत्रात्मक पृथक्पणा हेंच या प्रकारानें वैशिष्ट्य आहे.

## नांवाचा प्रश्न.

शेवटीं राहिला नांवाचा प्रश्न. कुटुंबाच्या स्थैर्यासाठीं स्वतंत्र राहतें घर, तसें नव्या लेखन-प्रकाराला स्वतंत्र नांव लागतेंच. तात्त्विक टीकेपेक्षां सर्वमान्य नांव ठरविणें हें कठीण आहे, याची आम्हांला जाणीव आहे.

लघुकथेची ( Short–Story ) भूमिका कायम ठेवूनहि वैशिष्ट्य दाखविणारें जसें ( Short–Short–Story ) हें नांव पाश्चिमात्यांनीं काढलें आहे, त्याप्रमाणें लघुकथेची भूमिका ठेवून वैशिष्ट्यदर्शक असें '**लघुतम–कथा**' हें नांव आम्ही नम्रपणें सुचवितों. अर्थात् हें नांव केवळ कामचलाऊ म्हणूनच या लेखांत वापरलें आहे.

**श्री.** खांडेकर यांनीं आपल्या रसिकतेस साजेल असें 'तृणांकुर' हें गोड नांव सुचविलें आहे या नांवानें या प्रकारच्या पूर्वपीठिकेचा

बोध होत नाहीं एवढेंच म्हणतां येईल. याबाबत चर्चा करीत असतां 'लघुलघुकथा' व 'संक्षेप–कथा' अशीं आणखीं दोन नांवें पुढें आलीं आहेत. 'लघु-लघु कथा' हें 'Short–Short–Story' यांचें यथार्थ भाषांतर आहे. मात्र यांतील द्विरुक्ति रसिकांना कितपत रुचेल याची थोडी शंका वाटते. 'संक्षेप-कथा' हें नांव अधिक सुटसुटीत आहे, परंतु यांतहि पूर्वपीठिकेचा संबंध येत नसून केवळ थोडक्यांत आणलेली कथा असा थोडासा तंत्रात्मक घोटाळा होण्याचा संभव दिसतो. अशा प्रकारें हे अनेक शब्द आम्ही वाचकांपुढें ठेवीत आहोंत. प्रत्येकांत कांहीं तरी वैगुण्य राहणारच, याची आम्हांला जाणीव आहे; तथापि "एको हि दोषो गुणसन्निपाते। निमज्जतींदोः किरणेष्विवांकः॥" असें म्हणून, रसिकांच्या 'कौला' चा कळा ज्या शब्दाच्या बाजूनें पडेल त्याचा स्वीकार करण्याची आमची तयारी आहे. त्याचप्रमाणें या कथा–प्रकाराच्या पुरस्कारांत आमचा कोणताही अभिनिवेश नसून, या संग्रहांतील कथांच्या अधरोत्तर भावाबद्दल वादविषय होण्याचीहि आमची इच्छा नाहीं हें टीकाकारांना आधींच सांगितलेलें बरें. सर्व पूर्वसूरींना वंदन करूनच आम्हीं लेखणी उचलली आहे. असो.

लघुकथेच्या दालनांत हल्लीं फार गर्दी होत चालली आहे असें टीकाकार म्हणतात. एखाद्या समारंभाचे वेळीं मुख्य दिवाणखान्यांत फार गर्दी झाली म्हणजे बाजूच्या खोल्यांचे दरवाजे उघडून त्यांत रसिकांना मोकळेपणानें बसण्याची सोय करतां येते. त्याप्रमाणें या नव्या दालनाचें दार उघडें आहे. तरी लेखक-वाचकांनीं त्यांत मोकळेपणानें संचार करून आराम घ्यावा अशी विनंति करून सध्यां रजा घेतों.

---

# ही कोण ?



‘ अं ! ’

ही कोण बुवा ! नवीनच दिसते कोणीतरी — चेहरा ओळखीचा दिसतो, पण अंगाची ठेवण निराळी ! ’



समोर पाहून माझ्या मित्रानें आपल्या चौकस स्वभावाला अनुसरून

— कायहो – आपली ती – ही तर नव्हे ?

—छे छे ! – तिची अगदीं ' धाकटी बहीण,' मी म्हणालों.

— हं. तरीच, चेहरा जरा सारखा दिसतो – बाकी इकडे कधीं दिसली नाहीं बुवा ! नाहीं तर तशी आमच्या नजरेंतून सुटायची नाहीं— अहो, आमची नजर म्हणजे अशी तशी समजूं नका, कोण नवीन 'मंडळी' आली, कुठून आली, कशी आली, रूप, रंग, बांधा, जात, कुळी—— खडान् खडा भविष्य बरोबर.

कामच आहे आमचें हें.

पण हिच्या बाबतींत मात्र ... आतां एखादीच्या बाबतींत: इतकी चर्चा करणें जरा औचित्याला सोडून होईल नाहीं ? पण काय करावं मूळ स्वभाव जाईना.

माझ्या मित्रानें चष्मा साफ केला.

— ती जरा लांब पण आमच्या समोरच उभी होती. आपल्या-बद्दलच या दोघांत इतकी चर्चा होत आहे याची तिला कल्पनाही नव्हती – बेफिकीरपणें समोर पहात ती कसलीशी प्रतीक्षा करीत होती.

वाऱ्यानें तिच्या डोक्यावरचा पदर जरा फडफडला. ती जरा बाजूला झाली, आणि तिच्या ओझरत्या ' पदध्वनी ' नें माझ्या मित्रावर मोहिनी घातली.

त्याची नजर पुन्हां आशाळभूतपणें तिच्याकडे लागली. तो पुन्हां माझ्या कानाशीं लागला.

—आपल्याकडीलच कां हो ही ! नेसण्यावरून तर परप्रांतांतली वाटते ही !

आहे रेखीव,: पण बरीच ठेंगणी वाटते ही नाहीं ? ...

पुन्हां त्यांचें सौंदर्यविश्लेषण सुरू झालें.

नित्याचीच बाब होती ही. स्वरूपाच्या बाबतींत फाजील चिकित्सक असले तरी आमचे मित्र तसे हृदयानें मात्र अगदीं सोंवळे हो !

आतांपर्यंत शेंकडों सौंदर्याचे नमुने त्यांच्या डोळ्यांखालून गेले असतील, पण—

कोणाचा ' बांधा ' च चांगला नाहीं – कोणाची ' चाल ' च

चालणें ' च पटत नाहीं अशा हजार खोडी ते काढीत. आशाळभूत आलेले त्यांचे वडील निराशेचा सुस्कारा टाकून आपल्या ' कन्यकां ' परत घेऊन जात, आणि असलें चांगलें ' स्थळ ' हातांतून गेल्याबद्दल हळहळ मानीत.

त्यांच्या शब्दांनीं आणि कुरकुरीनें मीही कंटाळलों होतों.

—' भारीच चोखंदळ बुवा तुम्ही ' मीं म्हटलें.

' सारे रूपगुण टाकून, जें नाहीं तिथेंच नेमकं लक्ष्य जायचं तुमचं. अहो, अशा नाजुक टेंगण्या बांध्यांतच खरं सौंदर्य असतं. नाहीं तर तुम्हांला भली पुरी उंटासारखी उंच, अन् हत्तीसारखी वाढलेली रुंद शूर्पणखा वरी वाटेल नाहीं ! '

... त ... सं नव्हे हो ऽ !

इतक्यांत तीच प्रत्यक्ष आमचेकडे मंद गतीनें येऊं लागली. तिच्या अंगावरील मोजके परंतु तेजस्वी ' अलंकार ' मधेंच चमकले.

ती जवळ आल्यावर मात्र माझ्या मित्राची चुळबुळ सुरू झाली.

—'इकडेच येते आहे वाटतं ही, आतां काय करावं ! माझा परिचय नाहीं हिच्याशीं ' ते हळूंच म्हणाले.

—'तें माझ्याकडे लागलं.' मी म्हणालों, ' तुम्ही घाबरूं नका, तुमची ओळख करून देतों मी – अगदीं धीट आहे ही – तुम्हांला पसंत आहे ना मनांतून ! – बोला.'

—आहे हो, पण लोक काय म्हणतील !

—म्हणूं द्या प्रथम लोकांना हवें तें – एकदां तिचं हें रूप अन् गुण दिसले म्हणजे तिच्या सहवासाबद्दल तुमचाच हेवा करायला लागतील सारे.

—हं करा धीर, ही आलीच.

लाजतां काय ! घ्या हिचा हात हातांत—अस्सं—...

\+ + +

उतरत्या टेबलावर ठेवलेली माझी पहिली ' लघुतम कथा ' वाऱ्यानें घरंगळत संपादकाच्या हातांत येऊन पडली होती. इतक्या चर्चेनंतरही अजून जरा साशंकच होते ते.

—' बरंय् , घेतों बुवा पुढच्या अंकांत ' म्हणून त्यांनीं हिरव्या पेन्सिलीनें तिच्यावर खूण केली.

# आंबे-मोहर.

—————:o:—————

सुवासिक मोहरानें ओथंबलेल्या आंब्याच्या झाडांनीं आमच्या विद्यालयाला गोड वेढा दिलेला आहे.

प्रथम हिरवागार, पुढें फिकट गुलाबी, आणि नंतर जणूं काय मंजिरी अन् देठांवर गुलाल सांडल्यासारखा तांबडा जर्द मोहर सर्व वातावरण उद्दाम उन्मादक सुगंधानें भरून टाकी.

एखादी कोकिळा त्या सुगंधानें मत्त होऊन विद्यालयाच्या खिडकीशीं फांदीवर बसून एकसुरानें सारखी कुहू कुहू करी.

एखादे वेळीं त्या आवाजानें आंतील अध्यापकाची चर्पटपंजरीही क्षणभर थांबे, आणि त्या क्षणिक शांततेंत सुगंधयुक्त वाऱ्याच्या लाटांवर कोकिळेचा गोड पंचम हेलावत येई.

पण शेवटीं तीही थकून चारा शोधण्यासाठीं जाई, आणि सुंदर मोहर टाकून आपल्या विद्रूप काटक्यांच्या घरट्यांत जाऊन बसे.

*                *                *

आज विद्यालयांतून परत जातांना या सौगंधिक वैभवाकडे पाहून मला चार वर्षांपूर्वीच्या माझ्या एका विद्यार्थि-मित्राची आठवण झाली.

खरा आम्रमंजरींचा शौकीन फक्त तो एक वसंतच.

झाडाखालीं पडलेल्या मोहोराचा खच लुटण्यांत त्याला सोन्याच्या मोहोरांच्या लाभापेक्षां जास्त आनंद होई. एखादी भरघोस, मोहोरानें ओथंबलेली मंजरी तोडण्यासाठीं झाडावर चढून त्यानें अनेक वेळां विद्यालयाच्या शिपायांचीं बोलणीं देखील सहन केलीं होतीं.

" 'वसंत' आला कीं आम्रमंजरींची लयलूट झालीच "—अशी शिळी कोटी त्याच्या नांवावर सारे विद्यार्थी करीत, कारण तो आल्यावर

त्याचे खिसे भरून ओसंडून जाणाऱ्या आम्रमंजिरींचा सुगंध भोंवताली पसरे. त्याचें हें वेड साऱ्यांना ठाउक झालें होतें इतकेंच नव्हे, तर त्याच्या अनुकरणानें फुलांऐवजीं या मोसमांत एक दळदार आम्रमंजरीच अंबाड्यावर खोंवण्याची एक फॅशनही कांहीं वर्षे विद्यार्थिनींत रूढ झाली होती.

आणि खरोखर, अशा भरघोस सहकार--मंजरींचा मादक गंध अनुभविल्यावर फुलांचींच इतकीं गाणीं कवींनीं कां गावीं याचें त्याला नवल वाटे.

कारण तोही एक जातिवंत कवि होता.

आम्रमंजिरीसारख्या दळदार, हळुवार अन् भावनोत्कट अशा त्याच्या छोट्या कविता विद्यालयाच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध होत.

... ... पण आतां याला चार वर्षे लोटलीं होतीं. सांपत्तिक अडचणीमुळें त्याला विद्यालयाचें शिक्षण अर्धवटच सोडावें लागलें होतें.

आज तो कुठें आहे, काय करतो हेंही कुणाला माहीत नव्हतें.

आजच्या नव्या विद्यार्थ्यांना तर त्याचें नांवही ठाऊक नव्हतें. बहुतेक अध्यापकही त्याला विसरले होते.

मंजरींनीं डंवरलेले विद्यालयाच्या भोंवतालचे आम्रतरु मात्र आजही त्याची आठवण काढून उदासीन होत होते.

* * *

घरीं अंगावरलें विलायती खोगीर उतरून मी बाजारांत गेलों. पुढील महिन्याच्या धान्याची खरेदी आज केलीच पाहिजे असें फर्मान: घरांतून सुटलें होतें.

धान्याच्या दुकानांत एक फिकट चेहेऱ्याचा, शून्य मुद्रेचा तरुण मळकट कपडे घालून धान्य मोजीत उभा होता. गादीवर बसून पान चघळीत असलेला एक ढेरपोट्या शेटजी वारंवार त्याच्या अंगावर खेंकसत होता.

इतर गिऱ्हाइकें गेल्यावर कपाळाचा घाम पुसून तो माझ्याकडे वळला.

—काय पाहिजे रावसाहेब ?

—चांगले तांदूळ आहेत कां—लवकर शिजणारे ?

—होय साहेब. आजच काढले आहेत वखारींतून.

जुने, साजूक, आंबे–मोहर.

—बघा ... सर !

त्यानें मला ओळखलें—त्याच्या मागच्या साऱ्या विद्यालयीन स्मृति जागृत झाल्या असाव्यात, कारण त्याचा आधींचाच निस्तेज चेहरा अगदीं फिक्कट दिसत होता.

उंची आंबेमोहर तांदुळानें भरलेला पसा त्याच्या नाकाजवळ त्यानें नेलेला होता, तो तसाच होता.

त्या आंबेमोहराच्या वासांत त्याला गतकालीन, विद्यालयाभोंवतालच्या आम्रमंजरीचा सुवास येत असावा.

त्याच्या डोळ्यांच्या कोपऱ्यांतून दोन अश्रु त्या पसाभर तांदुळांत पडले.

त्या दिवसापासून आंबेमोहर तांदूळ आमच्या घरांत आला नाहीं.

---

# जुना बाजार.

पंतांना 'सुपारीच्या खांडाचें' व्यसन नसलें तरी दुसरें मात्र जबर व्यसन होतें. बुधवारीं, रविवारीं, जुन्या बाजारांत फेरी मारल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. एरव्हीं कार्कूंच्या तोफखान्यापुढें क्षणांत ढांसळणारे पंत, ही गोष्ट निघाली म्हणजे मात्र छातीचा मेढेकोट करून उभे ठाकत.

गेल्या रविवारचीच गोष्ट—

पंतांनीं जुन्या बाजाराकडे मोर्चा वळविला होता. त्या 'मौल्यवान वस्तूंच्या मोडक्या बाजारांत' त्यांचे दोन तास भर्कन् निघून गेले. शेवटच्या दुकानाकडे नजर टाकून पंत मागें फिरणार तों तेथील पुस्तकांच्या ढिगाकडे त्यांचें लक्ष गेलें. मासिकांचे जुने अंक, वाचनालयांतून चोरलेलीं पुस्तकें, जुनीं शालोपयोगीं पुस्तकें यांचा तेथें खच पडला होता. एका मोठ्या रंगहीन वृत्तपत्रावर बैठक मारून पंत तीं पुस्तकें

चालूं लागले. त्या ढिगांत एक जीर्ण कसरीनें खाल्लेली पोथी त्यांच्या हातीं आली. पंत मोठे संशोधक होते असें नाहीं, परंतु जुन्या रद्दींत अनेक वेळां जुनें अमूल्य लिखाण सांपडतें असें त्यांनीं ऐकलें होतें. दोन आण्याऐवजीं एक पावली मालकांच्या अंगावर फेंकून ती पोथी घेऊन ते घरीं परतले.

येतांना आपल्या संशोधनाच्या कीर्तीचीं सुखस्वप्नें त्यांना दिसत होतीं.

घरीं येऊन मांजराच्या पावलांनीं ते आपल्या माडीवरील खोलीकडे जात असतां दारामागून वीज कडाडली !



—" आटपलं कां उकिरडे फुंकणं !-दिसतंय् कांहीं तरी बगलेंत ! एकादं झुळझुळीत लुगडं घ्या म्हटलं म्हणजे कपाळाला सत्राशेंसाठ आठ्या पडतात, नि या मेल्या फाटक्या पुस्तकांचा जुना बाजार भरविलाय् घरांत ! थांबा, आतां एक दिवस तीं सारीं पुस्तकें बंबांत घालतें कीं नाहीं तीं—चांगलं एक न्हाणं तरी होईल माझं ! "

यानंतर अर्धा तास सैंपाघरांत छोटे छोटे धरणीकंप होत होते !

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं पंत कचेरींतून येऊन माडीवर निसटणार तेवढ्यांत काकूंनीं हंसत हंसत त्यांचा जिन्याचा रस्ता अडविला. कित्येक वर्षांपूर्वीची, विसरलेली, एक जुनी पुराणी चमक पंतांच्या डोळ्यांत क्षणभर परतून गेली. काकूंनीं पदराखालीं झांकून: कांहीं तरी आणलें होतें.

" काय म्हणतें मी ? —ओळखायचं काय आहे हें— "

एखादी नवी आई जितक्या अभिमानानें आपल्या तान्ह्याच्या तोंडावरून पदर काढून त्याला दाखवील तितक्या अभिमानानें तिनें पंतापुढें ती वस्तु ठेविली—

एक ' पेढे-घाटा ' चा मसाल्याचा पितळी डबा, अन् त्यांत बसविलेले आठ लहान वाटीवजा डबे !

मानेला ऐसपैस वळसा देऊन काकू म्हणाल्या—" पण एक तांबडा पैसा दिला नाहीं हो याला ! त्या बोहाऱ्याशीं तासभर हुज्जत घातली. काल तुम्ही आणलेलं रद्दीचं पुडकं अन् माझं एक जुनं इरकली लुगडं एवढ्यावरच हा डबा घेतला. म्हटलं खर्च नको तुम्हांला.

—हताश होऊन पंतांनीं जिन्याच्या पायरीवरच बैठक मारली.

*    *    *

चार दिवसांनंतर एका प्रसिद्ध संशोधकाचा फोटो सर्व प्रमुख वृत्तपत्रांत झळकला... ...

**" मराठी वाङ्मयांतील अपूर्व शोध !**

**मुक्तेश्वराचें समग्र महाभारत सांपडलें !!**

' ...पुणें येथील प्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री—यांनीं पर्वतप्राय जुन्या रद्दींतील बाडांचें संशोधन करून मुक्तेश्वराच्या गुप्त झालेल्या संपूर्ण महाभारताचा शोध लावला असून त्याबद्दल त्यांच्यावर अभिनंदनाच्या व गौरवाच्या तारांचा वर्षाव होत आहे. या ग्रंथराजाचें प्रकाशन लवकरच मोठ्या थाटानें करण्यांत येईल.

पंतांनीं डोळे मिटून घेतले, आणि वृत्तपत्राचा चोळामेळा केला.

काकूंनीं आंतून येऊन सांजाची बशी त्यांच्यापुढें ठेवली.

—अहाहा ! काय चिंतन चाललंय् तरी ! नव्या डब्यांतल्या मसाल्याचा सांजा हा—कित्ती खमंग झालाय्—बघायचा तरी जरा चाखून !

# गोरी सवत



कुणाला खरं तरी वाटलं असतं कां ? सोन्यासारख्या माझ्या संसारांत या सवतीची पांढरीं पावलं उमटलीं अन् त्याची 'राखरांगोळी' व्हायला लागली.



त्यांच्या साध्याभोळ्या आयुष्यांत असलं रहस्य असेल अशी मला कल्पनाही नव्हती. अजून मी बापडी समजत होतें कीं, माझ्याइतकी प्रिय त्यांना जगांत कोणी नाहीं. पण शेवटीं ज्याची मला भीति वाटत होती तेंच झालं.

अजून आठवतो मला तो दिवस. किती शपथा घेणं झालं, किती वचनं देणं झालं—शेवटीं अगदीं पाया पडण्याचंच बाकी राहिलं होतं. मलाच लाज वाटली अन् त्यांचं तोंड बंद केलं मी.

तरी मैत्रिणींनीं कुणकुण लावलीच होती कीं, 'संभाळ हो बाई, त्यांना चोरून तिचा छंद आहेच' तरी मी आपलं खोटंच मानलं.

पण काल अवाचित लवकर आले अन् त्यांनीं प्रत्यक्ष तिच्या तोंडाला तोंड लावलेलं पाहिलं तेव्हां मात्र खात्री झाली माझी.

किती ओशाळले ते, किती गोंधळले—माझ्यासमोर तिला शिव्या देऊन खसकन् दूर लोटून दिलं—अन् ती निलाजरी ! कोंपऱ्यांत तशीच पडून राहिली.. मग अगदीं केरसुणी डोक्यांत घालून घराबाहेर काढली मीं तिला. साऱ्या गोष्टी डोळ्यांपुढें येतात.

काय करूं मी !

कोणी म्हणतात पुरुषांची जात अशीच, बायकांनीं तिकडे लक्ष्यच देऊं नये. अगदीं सोंवळेपणाची, सोज्वळपणाची अपेक्षाच करूं नये. त्यांच्याकडून आपला संसार सुखाचा चालला म्हणजे द्यावी नवऱ्याला थोडी मोकळीक. पण मी विचारतें, उद्यां मीच असं वागायला लागलें तर तें खपेल कां यांना ?

हो ! माझा स्वभावच जरा चमत्कारिक अन् चोखंदळ आहे. तरी लग्नाआधींच निक्षून सांगितलं त्यांना कीं, मला बाकी वाटेल तें चालेल—गरीबी असली तरी झोंपडींत आनंदानं दिवस काढीन मी—पण असली सवत खपायची नाहीं मला.

अन् आतां तेंच पहायचं कपाळीं आलं आहे माझ्या. ध्यासच घेतला आहे त्यांनीं तिचा.

'एक गोरी अन् दहा खोडी चोरी' म्हणतात, मग ही तर थेट इंग्लंडहून आलेली—गोरीपान, सडपातळ, शेलाटी !

छानछुकीची इतकी कीं,

दहा पावलांवरून घपकन् अत्तरासारखा वास यायचा तिच्या अंगाचा !

माझ्यासाठीं कांहीं हौसेनें आणायला सांगिलंं तर लागलीच काट-कसर अन् पुढची तरतूद याच्यावर एक व्याख्यान ऐकवतात मला, अन् चोरून मारून हिच्या घरांत किती पैसा लोटतात देव जाणे.

तरी इतके दिवस म्हणे तिची चोरून भेट घेणं चाललं आहे—आतां उद्यां उघडपणें माझ्याच उरावर आणून नाचवा म्हणावं; तेवढंच उरलं आहे आतां.

पैशाचं मेलं राहिना;—पण तब्येत तरी ! कसं गोल गुटगुटीत शरीर होतं, पण आतां उंसाच्या चिपाडासारखं झालंय् तिच्या पायीं. नाना रोग जडले, प्रत्यक्ष डॉक्टरांनीं निक्षून सांगितलं तरी तिचा नाद सुटत नाहीं.

— ही आलीच निलाजरी पुन्हां त्यांच्याबरोबर—कैदाशिणीचा हात धरून आतां लोटून देतें बाहेर गटारांत ... ...

—म्हणून विमलाबाईनीं वाघिणीसारखी झडप घालून आपल्या पतिराजांच्या हातांतील सिगारेट,—ती त्यांची गोरी सवत,—हिसकून रस्त्यावर फेंकून दिली !

---

# आनंदी प्राणी !



" ... मोठा आनंदी प्राणी आहे बेटा ! हेवा वाटतो त्याच्या आनंदाचा "...

सदाशिवरावांच्या खोलीकडे पाहून आमच्या चाळींतील सारे गृहस्थ उद्गार काढीत.

एकच महिना झाला होता त्यांना येऊन, पण तेवढ्यांत चाळींत जादूसारखा परिणाम झाला होता.

आम्हीं त्यांना दिलेलें दुसरें नांव ' बालमित्र '.

सकाळीं, संध्याकाळीं, चाळींतलीं सारीं मुलें त्यांच्या खोलींत जमलीं असायचीं. ते दुपारीं शाळेंत गेले म्हणजे तेवढें त्यांच्या खोलीला कुलुप.

शनिवार रविवार तर विचारूंच नका. मुलांच्या एकेरी, अन् त्यांच्या तिमजली हंशानें सारी चाळ दुमदुमून जाई.

त्यांची खोली म्हणजे मुलांच्या खेळाचें म्युझियमच बनलें होतें.

अर्ध्या खोलीभर पसरलेले गोल रूळ, त्यांवरून खरोखरीचा धूर सोडीत जाणारी, सिग्नलाशीं, स्टेशनाशीं, थांबणारी, बोगद्यांतून कू ऽऽ क् करून जाणारी कळीची आगगाडी ... '

—घ ऽऽ र आवाज करीत आढ्यापर्यंत भरारी मारणारीं छोटीं विमानें...

—भिंतीवरील पशुपक्ष्यांच्या डोक्यांवर नेम मारण्यासाठीं लुटुपुटूच्या बंदुका...

—जमिनीवर युद्धाच्या व्यूहांत उभे केलेले शिशाचे शिपाई, दुडुम् आवाज करून भेंडाचे गोळे सोडण्याच्या तोफा—किल्ले, मोटारी, चेंडू यांत सारीं मुलें दंग.

—मुलींसाठीं बाहुल्यांचा तर मीनाबाजार भरविला होता त्यांनीं. बाहुल्यांसाठीं पाळणे, ढकलगाड्या, मुलींच्या भातुकली सैंपाकासाठीं अगदीं चमच्यापासून चुलीपर्यंत सारा पितळी खेळ—त्यांनीं साऱ्या छोट्या मुलीही अगदीं वेडावून जात.

जेवायच्या वेळीं देखील त्यांच्या आयांना शेवटीं त्यांचे खवाटे धरून फरफटत न्यावें लागे.

त्यांना मित्र मात्र कोणीच नव्हते, आणि ते नोकरीच्या वेळेशिवाय बाहेरही पडत नसत. सकाळपासून मुलांची निजानीज होईपर्यंत गृहस्थ क्षणभर एकटा नसे. घरीं चाळींतलीं अन् दुपारीं शाळेंतलीं मुलें सदा त्यांच्या भोंवतीं.

चाळींत दहा वर्षं राहूनही शेजारच्या खोलींतल्या बिऱ्हाडाच्या बायकांशीं बोलण्याचा आम्हांला प्रसंग आला नव्हता. पण महिन्याच्या आंत साऱ्या चाळींतल्या बायका सदाशिवरावांना खुशाल ' दादा ' म्हणून हांका मारूं लागल्या होत्या !

कुणाला मैत्रिणीकडं बसायला जायचं असलं, कोणाला सासूबाईंना चोरून नवऱ्याबरोबर दुपारच्या सिनेमाला जायचं असलं, कोणाला पाहुण्यासाठीं लवकर सैंपाक करायचा असला, कोणाला सकाळपासून जरा ' कसंसंच ' होत असलं तर खुशाल दादांच्या खोलींत मुलाला अलगद सोडून दिलं कीं, झालं काम !

गृहस्थाची नजर, वर्तणूक मात्र इतकी साफ कीं, अगदीं अथेल्लोचा अवतार असलेल्या नवरोजीलाही त्यांच्याशीं आपल्या बायकोनें बोलल्या-बद्दल संशय घेण्याला जागा नव्हती.

आपल्या मागील पोरांच्या हट्टाची अन् मस्तीची ब्याद चुकली म्हणून सारे आंतून अगदीं खुषी, परंतु एकंदरीत त्यांच्या वागण्यामागें कांहीं तरी रहस्य आहे असें वाटल्यानें शेवटीं जरा बेफिकीरपणानें म्हणत.

‘ पोरकट आहे बेटा अजून झालं ! ’

× × ×

रात्रीं दहाचा सुमार होता. सारीं चाळींतलीं पोरें निजल्यानें सर्वत्र शांतता होती.

चाळीचें फाटक लावून यावें म्हणून मी नळाकडे चाललों. पंतांच्या खोलीवरूनच वाट होती माझी.

त्यांचें दार लावलें होतें—खोलींत उजेड होता. लोटलेल्या खिडकीचें दार मात्र जरा किलकिलें होतें, त्यांतून पहाण्याचा मोह मला आवरला नाहीं.

अन्—

दगडासारखा जमिनीला खिळून डोळे फाडून मी तिकडे पाहूं लागलों.

आमचे आनंदी प्राणी टेबलाशीं हातावर डोकें टेंकून, मान खालीं घालून अश्रु ढाळीत बसले होते.

एक एक अश्रु त्यांच्या डोळ्याच्या कोंपऱ्यांतून निघून नाकावरून ओघळत खालीं पडे, आणि विजेच्या दिव्याच्या प्रकाशांत गोळीबंद मोत्यासारखा चमके.

त्यांच्यासमोर टेबलावर एक सुंदर स्त्रीचा, आणि तिच्या शेजारीं एका गोंडस, गुटगुटीत, पाणीदार मुलाचा—असे दोन फोटो पडले होते.

आंतून एक जोराचा हुंदका आला—

मी भानावर येऊन खालीं मान घालून पुढें सरकलों. ... ...

पन्हां दसऱ्या सकाळपासन सदाशिवरावांची खोली त्यांच्या आणि

साऱ्या चाळींतल्या मुलांमुलींच्या खिदळण्यांनें आणि हंसानें दुमदुमलेली



होतचि ! आणि सारे म्हणत होतेच—
‘ मोठा आनंदी प्राणी आहे बेटा ! ’

# कोंबडा.



कुठल्याशा एका भिकार खेड्यांत शिवेबाहेर एका शेतकऱ्याची झोंपडी होती, आणि जवळच त्यानें एक कोंबड्याचें खुराडें केलें होतें.

जवळच एक गगनचुंबी वटवृक्ष होता. आभाळांत उंच उंच भराऱ्या मारून कर्कश शीळ घालीत झेंपावणाऱ्या घारी त्याच्या वरच्या फांद्यावर येऊन विश्रांतीसाठीं थोडा वेळ टेंकत.

आकाशाला हिरव्या रंगाची उडती झालर लावल्यासारखे दिसणारे

टाकणाऱ्या कोकिळा, तीक्ष्ण दृष्टीनें अनंताचे पडदे भेदून टाकणारे गरुड-पक्षी, सडक्या, कुजक्या वस्तूंवरच जगणारीं गिधाडें—या साऱ्यांचाच आधार तो वृक्ष होता.



खालीं हिरवळीवरील रानफुलांवर रंगीबेरंगी फुलपांखरें भिरभिरत, दूर अंतरावरून धान्याचे कण वाहून आणणाऱ्या कष्टाळू काळ्या मुंग्या जमिनीवरून लगबगीनें जात—मागील दोन पायांवर ऐटीनें बसून, पुढील पायांत एखादें वाळलेलें फळ धरून, मान वांकडी करून खारी तें ऐटीनें कुरतडत बसत.

जवळच्या घाणेरड्या खुराड्यांत कोंबड्यांच्या स्त्रीराज्यांत एक लालजर्द तुऱ्याचा कोंबडा मात्र अभिमानानें तट्ट फुगून, दररोज उच्चरवानें या सर्वांवरील आपलेंच स्वामित्व हट्टानें आरवून सांगे.

आपल्या रूपाच्या, कर्तबगारीच्या गप्पा त्या कोंबड्यांच्या कंपूपुढें खुलवून सांगणें, बाहेरचा एखादा मरतुकडा चुकलामाकला कोंबडा जवळ फिरकला तर त्याला पिटाळून लावून, विजयाच्या उन्मादांत छाती काढून फिरणें ... ...

या खेड्याभोंवतालच्या अफाट जगांत काय आहे याबद्दल एके दिवशीं त्या वडाच्या झाडाखालीं मोटी चर्चा झाली.

सर्वांच्या आधीं त्या कोंबड्यानें त्या खेड्याचें, तेथील उकिरड्याचें, तेथील कुणबाऊ स्त्रीपुरुषांचें वर्णन केलें, आणि यापलीकडे कांहीं नाहींच असें ठांसून सांगितलें. साऱ्या कोंबड्यांच्या कंपूनें माना डोलावल्या— "काय सूक्ष्म अवलोकन! काय वर्णनशैली! काय प्रतिभेचा विलास!" त्या उद्गारल्या!

गरुडानें उंच अंतराळीं, मेघमंडळाच्याही वर भरारी मारली.

खालीं पृथ्वीचा प्रचंड गोल गरगर फिरत होता. अनेक खंडें, देश, महासागर, पर्वत, समुद्र फिरत चालले होते. तो जरा खालीं आला. मोठीं प्रचंड शहरें, उद्योगधंद्यांची गर्दी, मोठमोटीं युद्धें, समुद्रावरून सळसळत जाणाऱ्या मोठ्या आगबोटी, पाचूच्या खड्यासारखीं हिरवींचार बेटें, पृथ्वीचें वैभव अन् मनुष्यजातीचें सारें जीवित त्याच्या दृष्टीखालून जात होतें. मानवजातीच्या महाकार्यांचीं महाकाव्यें त्यानें गाइलीं.

कोकिळांनीं जगांतील सुंदर संगीताची सजावट दाखविली—पोपटांनीं जगांतील गोड काव्यें म्हणून दाखविलीं, फुलपांखरांनीं चित्रविचित्र रंगीबेरंगी सुंदर चित्रांचीं, दृश्यांचीं हुबेहूब वर्णनें केलीं, गिधाडांनीं आपल्यापरीनें देशदेशच्या निरनिराळ्या घाणेरड्या वस्तूंच्या लज्जतीचें वर्णन केलें. रात्रींच्या प्रशांत वेळीं, घोर स्मशानांतून, जुनाट देवळांतून फडफडून मिळाविलेलें, आणि डोळे मिटून चिंतन केलेलें तत्त्वज्ञान घुबडानें विशद केलें.

मुंग्यांनीं अन् मधमाशांनीं जगांतील जीवनार्थ कलह आणि उद्योगधंद्याची माहिती पुरविली, संग्रहप्रिय खारींनीं पेढी आणि संग्रहाच्या बँकांबद्दल अद्भुत माहिती सांगितली.

खुराडांतल्या साऱ्या कोंबड्यांनीं कंटाळून जांभया दिल्या.

'छे, कांहीं अर्थ नाहीं यांत, कोरड्या गप्पा आहेत या,' त्या उद्गारल्या.

तांबड्या तुऱ्याच्या कोंबड्यानें पुन्हा पंख फडफडविले. तो म्हणाला— 'या साऱ्या पक्ष्यांच्या, जीवांच्या कुवतीपलीकडे मी भराऱ्या मारल्या आहेत. माझ्या अनुभवापलीकडे कांहींच नाहीं—मी पाहिलेल्या प्रदेशांत

—मी सांगतों त्याच जगांतल्या उत्तम गोष्टी.

—मी गातों तेंच जगांतलें उत्तम संगीत.

—मी पुढें मांडतों तेंच खरें तत्त्वज्ञान.

—मी दाखवितों तेंच सौंदर्य, अन् निर्माण करतों तीच खरी कला !

साऱ्या कोंबड्यांनीं कुकूचक् करून पंख हलवून त्याचा जयजयकार केला.

झाडावरील सारे पक्षी आणि जवळचे प्राणी देखील तिरस्कारानें हंसून इतर विशालतर प्रदेशाच्या प्रवासासाठीं निघून गेले—तो कोंबडा मात्र या ओसाड रानाचा अन् खुराड्याचा सर्वाधिकारी राहिला.

कोंबड्या म्हणाल्या कीं, या आमच्या वीरानेंच त्या साऱ्यांचा पराभव करून त्यांना पिटाळून लावलें, त्या कोंबड्याच्या आणि सामर्थ्याची कोणीच बरोबरी करूं शकणार नाहीं.

हीं स्तुतिस्तोत्रें ऐकून, आपला तांबडा तुरा पिस्कारून तो कोंबडा अभिमानानें आरवून नाचूं लागला.

—आंत शेतकऱ्याची सकाळपासून कांहीं तरी तयारी चालली होती.

त्यानें बाहेर येऊन त्या तांबड्या तुऱ्याच्या कोंबड्याला पकडून काखोटीला मारलें.

साऱ्या कोंबड्यांच्या समुदायांत एकच कोलाहल झाला.

जवळच एक शेंदूर फासलेला दगड होता. त्यासमोर उद, कापूर जाळून शेतकऱ्यानें एका घावानें त्या कोंबड्याचें मस्तक धडावेगळें केलें.

साऱ्या कोंबड्यां मात्र आपल्या विजयी वीराचा अनपेक्षित अंत पाहून आश्चर्यानें बधिर होऊन पहातच उभ्या राहिल्या !

दुसऱ्या दिवसापासून एक नवाच कोंबडा त्या खुराड्यांत डौलानें आरवूं लागला.

त्याच कोंबड्या पुन्हा त्याचींही तींच स्तुतिस्तोत्रें गात होत्या !

---

# नास्तिक ?

घण् घण्—

घंटेचे दोन टोले झाले. खांद्याभोंवतीं काळा झगा नीट लपेटून घेऊन—टायची गांठ जरा सरळ करून, केसावरून हात फिरवीत प्रोफेसरांनीं वर्गांत प्रवेश केला.



ते येईपर्यंत दाराजवळ कुजबुजत उभ्या असलेल्या विद्यार्थिनींनीं त्यांच्या मागोमाग शिरून आपल्या राखीव जागा काबीज केल्या. स्टँपिंगच्या चौघड्यानें त्यांचें स्वागत केलें, आणि मागील बाकावरील विद्यार्थ्यांत कागदी विमानांचा कारखाना सुरू झाला. ' डार्विनच्या ' ' उन्क्रांति—वादा ' चा प्रोफेसरांचा आवडता विषय होता. आपल्या टिपणांवरून नजर टाकून प्रोफेसर गर्जूं लागले ... ... 'धर्म सांगतात परमेश्वरानें निरनिराळे जीव उत्पन्न केले, विश्व उत्पन्न केलें—

स्त्री-पुरुष निरनिराळे उत्पन्न करून त्यांना बुद्धिवैभव दिलें.—बायबल—कुराण—वेद, झाडून साऱ्या धर्मग्रंथांत हीच कथा.

—पण विज्ञानानें ही वेडगळ कल्पना ठरविलेली आहे. या बंडाचें पहिलें निशाण डार्विननें उभारलें. ...

टवाळांच्या कारखान्यांतलें एका कागदी विमानाचें निशाण वरून भिरभिरत येऊन एका विद्यार्थिनीच्या डोक्यावर उभारलें गेलें! तिनें मान वेळून—खालचा ओंठ चावून तें पायाखालीं तुडविलें.

उपरोधिक हास्याची एक लाट समांतर बांकावरून उसळून गेली.

—प्रोफेसरांची गर्जना सुरू होती.

...जीवांचें वर्ग स्थिर नाहींत—एका जातींतून दुसऱ्या जातींत उत्क्रांति होत जाते. जलचर—भूचर—प्राण्यांची उत्क्रांति होत होत माकडाचा मनुष्य झाला.

—तुमच्याकडे पाहिलें म्हणजे तसं वाटतं खरं—एक खट्याळ विद्यार्थी उद्गारला.

—कुठें आहे परमेश्वर? प्रोफेसर गर्जले.

—आकाशांत कोणीतरी हळूंच म्हणाला.

आम्ही शास्त्रज्ञांनीं दुर्बिणींनीं सारें आकाश धुंडाळलें पण आम्हाला तो सांपडला नाहीं—मग कुठें आहे तो?

—हृदयांत!

गीता वाचलेल्या, आडवें गंध लावलेल्या, एका सनातन्यांच्या भावी पुढाऱ्यानें कोंपऱ्यांतून उत्तर दिलें.

—हृदयांत! लाखों हृदयांची आम्हीं चिरफाड केली पण आम्हाला त्यांत तो तुमचा ईश्वर कुठें दिसला नाहीं.

—बस्-! उत्क्रांति तत्त्व हेंच खरें—परमेश्वर झूट, आजच्या विज्ञान-युगाचा हा संदेश, डार्विनसारख्या शास्त्रज्ञाचा हा संदेश....

प्रोफेसरांचा आवाज उंच चढला, पण घंटेच्या घणघणाटांत त्यांच्या वाक्याचा शेवट कोणाला ऐकूंच गेला नाहीं.

* +

' कसें आहे बाळाचं ? '

गल्यांत पाऊल टाकीत डोक्यावरची हॅट काढीत प्रोफेसरांनीं पत्नीला प्रश्न केला.

पाळण्याच्या कडीवर तिचें डोकें टेकलें होतें. तिचे डोळे ओले अन् लाल दिसत होते.

—हात लाववत नाहीं अंगाला.

—डॉक्टर काय म्हणतात ?

—बहुतेक आशा नाहीं म्हणून, दुसरे मोठे डॉक्टर बरोबर घेऊन दुपारीं येऊन गेले.

पाळण्यांत डोळे मिटून निपचित पडलेल्या त्यांच्या एकुलत्या एक मुलाकडे प्रोफेसरांनीं पाहिलें. त्याचा काडीसारखा झालेला क्षीण देह पाहून



त्यांच्या हृदयाला धक्काच बसला. लोखंडाची कांबसुद्धां वितळून जाईल इतक्या उष्णतेनें, मग या चिमुकल्या देहाची काय कथा !

—हुंदक्यांत दबलेला त्यांच्या पत्नीचा आवाज आला.

—देव नको, धर्म नको,–कुळाचार नको, तुम्हांला मी म्हटलं अभिषेक करावा–एकादष्णी सांगावी. देवीला नवस बोलीन तर त्याची मनाई–एवढाला डोळा करायचा !–म्हणे डॉक्टर करतील बरं.

—तुम्हांला साडेसाती आहे. साऱ्यांनीं सांगितलं–शनिदेवाची पूजा तरी करायची.

चालला हो माझा बाळ सोडून मला ! तिनें हंबरडाच फोडला.

× × ×

संध्याकाळीं नदीकांठानें चार विद्यार्थी फिरून येत होते. तबकांत गोड्या तेलाची वाटी, कापूर, खडीसाखर, उदबत्ती, नारळ, फुलाची माळ घेऊन खालीं पहात जाणाऱ्या एका भाविकाला त्यांचा धक्का लागला.

—अहो भक्तराज ! जरा पुढें पाहून चला म्हटलं !

—त्यानें वर पाहिलें.

—कोण प्रोफेसर ! चारही विद्यार्थी आश्चर्यानें उद्गारले ! ताम्हणांत सांडलेली तेलाची वाटी सांवरीत खालीं मान घालून डार्विनचे भक्त प्रोफेसर शनिदेवाच्या देवळाकडे चालले होते.

---

# ' इस हात दे......



आई ऽऽ पाणीऽ...

× × ×

कळकाच्या कौलारु खोपटांत डबक्यांतला घासलेटचा दिवा प्रकाशा-इतकाच काळाकुट्ट धूर आणि अंधारही सोडीत होता.

एका बाजूला तुडविलेल्या गवताच्या ढिगांत म्हातारासा, बरगड्या बाहेर आलेला घोडा मधून मधून टापा आपटीत होता. रात्रपाळीचा टांगा असल्यानें चुलीजवळ बसून गणपत कसेतरी भाकरीचे दोन घास घशाखालीं ढकलीत होता.

शेजारीं फाटक्या गोधडीवर त्याचा मुलगा पांढरा फटक होऊन पडला होता. त्यानें पुन्हां क्षीण आवाजानें हाक मारली—

आईऽ पाणीऽऽ—

त्याचें तोंड पिठासारखें पांढरें पडलें होतें, हातपाय थंड आणि ओलसर लागत होते. कॉलऱ्याची सांथ साऱ्या शहरांत थैमान घालीत होती. सकाळपासून त्याच्या आईनें घरगुती उपाय करून पाहिले होते परंतु त्याच्या वांत्या आणि ढाळ थांबले नव्हते.

—पोराचं लक्षण ठीक दिसत नाहीं—डागतरला तरी बोलावा—जावा—

तिनें रडत गणपतला सांगितलें.

डॉक्टर !

डॉक्टर 'धन्वंतऱ्यांचा' बंगला जवळच होता—पण ते धन्वंतरी श्रीमंतांचे—गरीबांचे नुसते काळ होते.

गणपतनें जड अंतःकरणानें घोड्याच्या पाठीवर थाप मारली. संथ [illegible] त्या मायेच्या स्पर्शानें

त्या घोड्याची पाठही आनंदानें शहारली.

डॉक्टरांच्या बंगल्याशीं त्यानें टांगा उभा केला.

कोण आहे रे !

डॉक्टरांचा करडा आवाज आंतून आला.

—डागतर साहेब, पोरगं लइ शीक आहे—सकाळपासून ढाळ—वांत्या ऱ्हतात—वाइच पगून औषध द्याल तर जन्माचं उपकार ऱ्हतील गरीबावर—

ठराविक आवाजांत डॉक्टर म्हणाले—



पांच रुपये ठेव इथं—अन् चल बरोबर.

पुढें येऊन गणपतनें त्याचे पाय धरले.

—पोराच्या जीवाशपथ साहेब—कालपून धन्यानें पैबी खायाला दिली

न्हाइ भाड्यांतली–अन् पांच रुपयं कुठलं आनू साहेब–पण फुकाट तरास न्हाई देनार तुमाला–टांगा हाय धन्याचा, पन येऊन जाऊनं आपन फिरून शान फेडून घ्यावं पैसं.

—चल, उपकार नकोत–पैसे असले तर ठेव, नाहींतर हो चालता–साऱ्यांची काळजी आम्ही देऊं लागलों तर जीवंत रहायला नको आम्हाला...

—चल बेटा–गणपतनें जड पावलानें परत येऊन लगाम हलविला. घरावरून जातांना जरा थांबून तो आंत शिरतो तों बायकोच्या रड-ण्याचा साद आला.

—सारा ग्रंथ आटपला होता.

तो आवाज ऐकून, आपल्यावर पाळी नको म्हणून शेजारपाजारचे जातवालेही मुकाट्यानें दिवा विझवून घोरूं लागले होते.

मुकाट्यानें त्या मृतदेहावर गोधडी ओढून त्यानें टांगा पुन्हां चालू केला—

या गडबडींत बारा वाजून गेले होते–सिनेमांचे खेळ आटपून बाहेरचे दिवेही विझले होते.

ओसाड टांगा स्टँडवर तो एकटा होता.

चोरून लगबगीनें घरांच्या सांवलीनें जाणारा एखादा रंगेल तरुण किंवा झोकांड्या खात जाणारा दारुड्या याशिवाय सारे रस्ते निर्जन होते.

—ए टांगा–

मागून एक हांक आली.

त्यानें मागील गादी झाडली.

कुठं जायचं साहेब ?

—लष्कर–जलदी–काय घेणार ?

—तीन रुपये या वक्ताला......

—जाऊन येऊन पांच देईन, चल लवकर—

पांच रुपये ! दोन तासांपूर्वी मिळाले असते तर हे !

लष्करांत एका इंग्रजी दुकानांतून गिऱ्हाइकानें एक औषधाची पेटी घेतली आणि टांगा परत वेगानें निघाला—

—कोणी शिक हाय जनु ! त्यानें प्रश्न टाकून पाहिला.

होयरे बाबा, आमच्या डॉक्टरांचा मुलगा आजारी होता त्याची तब्येत बिघडलीय् जास्त. कुटलं जगावेगळं इंजेक्शन सांगितलंय् हें, लष्करा-शिवाय कुठे मिळालं नाहीं. चल लवकर, घाबरं झालंय् पोर—तें—मधेच टांग्याला धक्का बसून तो थांबला.

काय झालं रे...

कांहीं नाहीं साहेब, लगामाची वादी तुटलीय् पुढची, आतां करतों नीट, गणपतनें उत्तर दिलें.

भोंवतालीं कुठेंच दुसरा टांगा नव्हता.

झालंच साहेब—झालंच साहेब म्हणूनही अर्धा तास लागला त्या खटपटीला.

त्याच्या राहत्या रस्त्यांतूनच त्या गिऱ्हाइकानें टांगा घेण्यास सांगि-तला आणि शेवटीं उभा केला तो—डॉक्टर धन्वंतरी यांच्या बंगल्या-समोरच ! कांपौंडर घाइघाईनें इंजेक्शनची पेटी घेऊन आंत गेले अन् एक मिनिटांत तीं भिरभिरत बाहेर येऊन रस्त्यावर तिच्या ठिकऱ्या उडाल्या—

मागोमागच डॉक्टरीणबाईचा हंबरडा रस्त्यावर, स्पष्ट ऐकूं आला.

कसा सोडून गेलास रे बाळाऽऽ ! '

पटापट शेजारच्या खोल्यांत—घरांत—दिवे लागले—समाचाराला बायका जमल्या.

हो, सहज आपली उपकारांची ठेव डाक्टरीणबाईजवळ टाकून जावी, उपयोगी पडायची कधीं तरी !

गणपतनें पांच दहा हाका मारल्यावर कंपौंडर त्याच्या हातावर पांचाची नोट टाकून गेला—

चक्चक् करून त्यानें टांगा वळविला.

त्यावेळीं त्याच्या डोळ्यांत आसुरी समाधानाचें भेसूर तेज तळपत होतें !

———

# बेबी.



तो अन् ती.

किती अभिमानानें आणि प्रेमानें पहात होते त्यांच्या बेबीकडे! इतक्या दिवसाच्या अपेक्षेची, इतरांच्या ईर्षेची, गोड हुरहुरीची सार्थकता त्या नजरेंत होती.

यापूर्वी इतरांकडे पाहून त्यांना हेवाच वाटे—आपल्यालाही अशी बेबी असती तर!

हा विचार त्यांच्या मनांत येऊन जाई.

तिच्याशिवाय त्यांच्या संसारांत कांहींच कमी नव्हतें.

शेवटीं एके दिवशीं तिनें त्याच्या कानांत कांहीं तरी सांगितलें, आणि तेव्हांपासून त्याच्या आयुष्यांत बराच पालट झाला. इतके दिवस आपण आणि आपली, यांना पुरेल इतकेंच मिळवून तो स्वस्थ बसत असे. आतां मात्र आपल्या घरीं येणाऱ्या नव्या बेबीसाठीं, तिच्या पुढील तरतुदीसाठीं तो जीवापाड श्रम करूं लागला होता.

एक वर्ष लोटलें होतें याला.

त्याच्या चेहऱ्यावर समाधान होतें.

तिच्या चेहऱ्यावरून अभिमान ओसंडत होता.

त्यांच्या घरांत छोट्या बेबीचें आगमन झालें होतें. तिनें मोठ्या आनंदानें आपल्या साऱ्या मित्रमंडळींना बोलावून त्यांच्या पुढ्यांत तिला अभिमानानें मिरविलें होतें.

आतां साऱ्या पाहुण्यांची गर्दी ओसरल्यावर हातांतहात घालून डोक्याला डोकें लावून मोठ्या आनंदानें आणि अभिमानानें ते आपल्या बेबीकडे पहात एकाच खुर्चीवर बसले होते.

त्यांच्या पहिल्यावाहिल्या बेबीचें कोडकौतुक तें! लहान असून बांधा किती सुरेख, सुबक, प्रमाणशीर! तिला काळजी होती फक्त रंगाची-

काळीच होऊन येते की. काय ! आपल्या हातचं आहे कुठं !

पण हिचा रंग निघाला किती सुंदर, गोरापान, किंचित् फिक्या गुलाबी रंगाची छटा होती तिच्यावर, अन् अंग मऊ गुळगुळीत तरी किती !

—डोळे तरी किती तेजस्वी ! त्यांच्या भोंवतालचा सारा अंधार ते उजळून टाकीत होते.

—हो, अन् आवाज !

एखादे वेळीं इकडे तिकडे नेतांना ती रडे, ओरडे, हट्ट करी ! तरीही तिच्या त्या गोड खणखणीत आवाजानें त्या दोघांना आनंदच होई.

खरं सांगायचं तर केवळ तिचा गोड आवाज ऐकण्यासाटींच ते तिला उगीचच डिवचीत, अन् ती रागानें ओरडली म्हणजे समाधानानें आणि नाविन्याच्या आनंदानें हंसत ! आकाराच्या, वयाच्या मानानें तिची चपळाई तरी किती !

तिला आवरतांना त्यांना अगदीं पुरेपुरेसें होई.

दुसऱ्यासारखी त्यांनीं इतरांवर तिची निगा सोंपवली नव्हती.

ती स्वतः आपल्या लाडक्या बेबीला न्हाऊं–माखूं घाली, बाहेर फिरवून आणि, आणि तीहि गुलाम फिरून आली म्हणजे डोळे मिटून गुपचूप झोपी जाई.

त्यांना नवल वाटे तें तिच्या वागणुकीचें. एवढ्या लहानशा शरीरांत समजूतदारपणा किती भरून राहिला होता ! हट्ट अवखळपणा तिच्या गांवींहि नव्हता. प्रकृति धडधाकट असल्यानें इतरांप्रमाणें तिला वारंवार चिकित्सकाकडे जावें लागतच नव्हतें. चांगली हवा आणि नेहमींचा खुराक यावरच ती अगदीं निरोगी आणि चपळ होती. दररोज तिला घेऊन ते मोकळ्या हवेंत खूप लांबवर फिरून येत.

आतां पाऊस थांबला होता.

हवा स्वच्छ, थंड, सुवासिक अन् आल्हाददायक अशी वाटत होती.

तो अन् ती उघाडीचीच वाट पहात बेबीकडे पहात बसले होते.

त्यानें बेबीला हळूंच काळजीनें बंगल्याच्या दाराबाहेर आणलें.

पुढें जाऊन हॅंडल जोरानें फिरविला,—आणि त्यांची बेबी–ऑस्टिन मोटार तीरासारखी वेगानें निघाली !

# हिरवी माडी



पच्...

लालभडक विड्याची पिंक माझ्या अगदीं शेजारीं रस्त्यावर पडली. मी रागानें वर पाहिलें—

रस्त्याच्या कडेस हिरव्या माडीच्या खिडकींतून एका रंगविलेल्या, सुरकुतलेल्या तोंडानें बत्तीशी दाखविली — पण माझें लक्ष्य वेधलें होतें तिच्या शेजारीं उभ्या असलेल्या एका तरुणाकडे.

माझी नजरभेट होतांच त्याचा चेहरा जरा गोरामोरा झाला आणि खाडकन् ती हिरवी खिडकी लागली.

—इतका बुद्धिवान्, सरळमार्गी मनुष्य या फंदांत पडावा ना ! नशीब ! म्हणून पुटपुटत मी पुढें चाललों होतों.

इतक्यांत माझ्या पाठीवर थाप पडली.

—कोण सदानंद ! —कां, आपली अप्सरा सोडून आमच्यासारख्या रूक्ष माणसाची कां आठवण झाली ? मी जरा खोंचून विचारलें.

दिव्याच्या प्रकाशांत मी त्याच्याकडे निरखून पाहिलें.

एखाद्या सामाजिक चित्रपटांतील खलपुरुषाच्या भूमिकेसारखा त्याचा वेष होता.

मानेवर लोळणारे उलटे फिरविलेले केंस, कानशिलाखालीं अर्ध्या गालावर सरळ वाढलेला गालदाढीचा काप, आणि खिशांतून अत्तरानें भिजलेला हिरवा-तांबडा रेशमी रुमाल.

दोन वर्षांपूर्वी बी. ए. झालेला सात्त्विक, सोज्वळ, सरळ, कवि सदानंद हाच कां, असा मला प्रश्नच पडला. मला वाटतें त्याला माझे विचार कळले असावेत.

—जाऊं देरे दोस्त, कशाला डोक्याला शीण देतोस, चल बसूं कुठें तरी. चांदणं कसं सुरेख पडलंय्—तो म्हणाला.

—पण स्वस्थ आरामांत बसायला साऱ्या पुण्यांत अशी जागा आहे कां !

आहे की एक—

ओंकारेश्वराजवळचा नवा पूल !

आमच्या पुण्याची चौपाटीच ती !



चंद्राच्या अस्पष्ट प्रकाशांत समोरच्या प्रदेशावर झिरझिरीत पडदा सोडावा असें अंधुक दृश्य दिसत होतें. उजव्या हाताला रेलवेच्या पुलावरून एक मालगाडी दमेकऱ्यासारखीं जोरानें उच्छ्वास टाकीत पुढें मागें होत होती. लांब समोर शिवाजी महाराजांचा अश्वारूढ पुतळा, डावीकडे लांब पर्वतीचे अंधुक डोंगर आणि देवळांचीं शिखरें.

—अगदीं चमत्कारिक वाटलं असेल तुला नाहीं? सदानंदानें विचारलें. जरा थांब, मला नैतिक व्याख्यानाचा डोस पाजण्यापूर्वी माझी हकीकत ऐक अन् मग बोल ... कॉलेजांत मी तत्त्वज्ञान विषय घेतला होता—जगाचें तत्त्वज्ञान, सारीं धर्मतत्त्वें कोळून प्यालों मी. आणि त्यांच्या परस्पर विरोधानें हें सब झूट आहे असा माझा निर्धार झाला—मग काय उरलं!

सौंदर्य, कला आणि प्रेम—माझे शेवटले आधार. ऐक आतां—त्यानें सिगारेट पेटवली आणि दोन जोराचे दम मारले. बोगद्यांतून बाहेर पडल्यावर इंजिनाभोंवतीं सांचतात तसे धुराचे फवारे त्याच्या डोक्याभोंवतीं खेळत होते.

—माझें प्रेम अर्पण केलेल्या मिस् सरोजनें थंडपणें नुसतें "सॉरी हं" म्हणून एका श्रीमंत इंजिनियरशीं आपलें लग्न ठरल्याचें सांगितलें.

अनेक चित्रकार, कवि, प्रख्यात लेखकांच्या मागें मागें राहून एक वर्ष काढलें मी.

—जगाला सत्य, शिव आणि सुंदर यांचे धडे देणारे हे कलावंत कसल्या खातेऱ्यांत लोळतात, कसे वागतात, कसे भांडतात, हें पाहून माझी सारी श्रद्धा उडाली. बेगडीनें मढविलेल्या शेणाच्या भावल्यासारखें हें जग मला दिसूं लागलें—असत्यमय जगांत सत्य काय उरलं?—देहभोग हेंच—

बस्—खावं, प्यावं, चैन करावी—हेंच सौख्य; विचार केला की तो मेला—

विचार आला कीं दारूच्या पेल्यांत मी त्याला बुडवून टाकूं लागलों, आणि तूं पाहिलंस तिथें बेहोष होऊन पडूं लागलों. राहतं घर विकून ही चांदरात चालविली आतांपर्यंत.

पण आतां या शारीरिक भोगांचीही शिसारी आली आहे मला--

—अरे अरे ! काय दशा ही सदानंद ! बुद्धीचा, कर्तबगारीचा कांहींच उपयोग करतां आला नाहीं तुला जगांत ! भोगाचा आनंद विरला तर त्यागाचा आनंद अवीट असतो-पण जाऊं दे या तात्त्विक गोष्टी. चल तुझ्या नोकरीची खटपट करतों मी अन् लग्नाची बेडी अडकवून टाकतों पायांत म्हणजे येशील मार्गावर--चल घरीं माझ्याबरोबर—

—फार उशीरा आलास दोस्त—

तो शून्यपर्णे वर पहात होता. मंगळाचा तांबडा तारा माणकासारखा चमचम् करीत होता-तिकडे बोट दाखवून तो म्हणाला-मंगळावर वस्ती आहे म्हणतात. आपल्या जगापेक्षां तें अधिक चांगले असेल कां रे ? हं, जा घरीं तूं आतां. वहिनी वाट पहात असतील तुझी. मी पडतों इथेंच बांकावर जरा. परवां भेटूं. माझा पत्ता तुला माहीत आहेच—

हिरवी माडी !

घरीं जाईपर्यंत त्याचें तें भेसूर हास्य माझ्या कानांत घुमत होतें.

* * *

तिसऱ्या दिवशीं त्याला भेटून कांहीं तरी करावें म्हणून सकाळीं निघणार तों वर्तमानपत्रांतील ठळक ठशांत छापलेली बातमी मला दिसली.

**नव्या पुलाजवळ नदींत तरुणाचें प्रेत ! खून कीं आत्महत्या ?**

# वारसें ?



निमलाबाईची मोटार फर्रकन् दवाखान्यासमोर येऊन थांबली.

' मातृमंदिर—'

ही सोनेरी पाटी दवाखान्यावर झळकत होती.

मोटारीचें दार धाडकन् लोटून देऊन हातांतील छोटी मनीबॅग हलवीत ती आंत शिरली.

लहान मुलांच्या रडण्याचा आवाज, आणि घप्कन् येणारा जंतुनाशक औषधांचा वास येऊन, तिच्या नाकाला मुरड आणि कपाळाला आंठी पडली.

बाकी विमलला या मातृमंदिरांत कोणी शिरतांना पाहिलें असतें तर त्याला तो भासच वाटला असता.

—कारण तिचे जाहीर आवडीचे विषय म्हणजे—संतति—नियमन, गर्भपात, आणि बालहत्या !

तिच्या व्याख्यानांत, लघुकथांत, कादंबऱ्यांत हाच विषय.

दर सहा महिन्यास कादंबरी बाहेर पडे.

'····मुलें म्हणजे बायकांच्या पायांतील बेडी, नवरे म्हणजे कामुक पशू. कामुक, आर्थिक, वैवाहिक स्वातंत्र्य हा स्त्रियांचा जन्मसिद्ध हक्क आहे" याच तत्त्वांची त्यांतून फैर झडे.

साऱ्या शहरांत संतति—द्वेष्टी म्हणून तिची ख्याती झाली होती.

नाइलाजानें लग्न करून ती नवऱ्याला नोकरासारखें वागवी—एका सुशिक्षित बेकारानें तिची वैवाहिक नोकरी पत्करली होती.

' जनरल वॉर्डांत ' दुतर्फा पसरलेल्या बाळंतिणींच्या खाटांतून मार्ग काढीत ती स्पेशल खोलींत आली.

एका क्षीण आवाजानें तिचें स्वागत केलें—

' ये विमल—मला वाटलं होतं कीं तूं येतेस कीं नाहीं—कारण तुझं तें वेड जाहीरच आहे. '

'—तुझ्या आग्रहासाठीं हो ताई ! नाहीं तर अशा ठिकाणीं मी पाऊलहि टाकलं नसतं—इश्य, काय ही घाण ' !

विमलनें सेंटचा हातरुमाल नाकाला लावला.

जवळ लोखंडी खाटेवर तिची सुमाताई निजली होती.

पांढऱ्या शुभ्र उशीवर हॉस्पिटलच्या पद्धतीप्रमाणें घातलेल्या तिच्या दोन वेण्यांचीं शेपटें पसरलीं होतीं.

नुकत्याच झालेल्या प्राणांतक श्रमामुळें तिचा चेहरा पांढराफटक पडला होता—तिचे क्षीण हात पोटाशीं घेतलेल्या एका पांढऱ्या मऊ ब्लँकेटाच्या गुंडाळीवर मधून मधून फिरत होते.

त्यांतून एक बारीक आवाज आला.

तिनें हळूंच तें पांघरूण थोडेसें दूर केलें.

अगदीं लहान—लालभडक अंगाचें—इवलेसे हातपाय—मोठेंसें डोकें—घट्ट मिटलेले डोळे—घट्ट मिटलेल्या मुठी—असें नुकतेंच जन्मलेलें मूल होतें तें.

सुमाताईच्या डोळ्यांत कांहीं तरी नवीन तेज भरलें होतें—

' अरे लबाडा ! काय झालं रडायला उगीच ?—मावशी आलीय् बाळाची...'

'—घेतेस कां जरा याला विमल ?'

'—इश् ! नकोग बाई ! तो मांसाचा गोळा मला संभाळतां सुद्धां येणार नाहीं—तूंच घे; ' त्याला विमल मागें सरकून म्हणाली.

...' इतका त्रास—अगदीं जिवावरचा प्रसंग—अन् तो या अशा माकडासारख्या पोरासाठीं—इश्श् ! '

'—बरं बरं ! असूं दे माझं पोर माकडासारखं !' सुमा जरा खोट्या रागानें म्हणाली.

' अर्गट मिक्श्चर ' घेऊन नर्स आंत आली होती.

'—या आमच्या ताईसाहेब—प्रसिद्ध लेखिका विमलाबाई—,सुमानें ओळख करून दिली.

—मुलाची चड्डी बदलून नर्सनें त्याला नीट निजविलें—सुमाला टेंकून बसती केली.

—' माय मरो अन् मावशी जगो ' म्हणतात लोक, अन् ही मावशी

तर मुलाला हात पण लावीत नाहीं, असंच कां ?—हं, घे याला' सुमानें हंसत हंसत मुलाला पुढें केलं—

—विमलनें नाइलाजानें नखख्यासारखे आपले हात पुढें केले.

—' आहाहा ! असं घेतात कां कधीं—अस्सं—नीट घे—मान संभाळ हो—'

या नव्या आईनें पोक्त आजीबाईच्या गांभीर्यानें आणि अधिकारानें सांगितलें.

त्या इवल्याशा पोरानें आपले नितळ काळेभोर डोळे उघडून वर विमलकडे नजर टाकली—मऊ—मऊ अगदीं मखमलीहून मऊ, घट्ट मिटलेल्या इवल्याशा मुठींचा स्पर्श तिच्या गालाला झाला—

विमलला कसेंसेंच होऊं लागलें—तिनें घाईघाईनें मुलाला बिछान्यावर ठेवलें.



—' हळं हो ! किती घसमुसळी तूं '—म्हणून सुमानें त्याला पोटाशीं घेत

नंतर अर्धा तास विमल एखाद्या पुतळीसारखी बसली होती-सुमाताईच्या बोलण्याकडे तिचें लक्ष्य नव्हतें.

तिच्या मनांत काय विचार होते ते तिलाच ठाऊक. तासानंतर मोटारींतून उतरून ती आपल्या शून्य बंगल्याचें कुलूप उघडून आंत गेली तेव्हां विजेच्या दिव्याच्या प्रकाशांत तिच्या डोळ्यांत आंसवें तरारलेलीं दिसलीं हें मात्र खरें.

पुढच्या वर्षी थाटानें झालेलें विमलच्या मुलाचें बारसें मात्र सर्व शेजारींच नव्हे तर शहरांतील तिच्या वाचकांच्याहि चर्चेचा विषय होऊन बसलें होतें. मुलाला बाबागाडींत घालून, त्याच्याशीं बोबडें बोलून हंसत जाणारी विमल हीच पूर्वीची 'बालहत्या' या क्रांतिकारी कादंबरीची लेखिका म्हणून सांगितलें तर आज कोणाला पटणारहि नाहीं !

---

# मुंबईचा दंगा.





मुंबईचा भयंकर दंगा !

उद्भवला—वाढला—आणि संपला.

शेकड्यांनीं गरीब लोक मेले, आणि हजारांनीं जखमी झाले. चार दिवस वर्तमानपत्रांची चंगळ झाली—मोठमोठ्या जाड अक्षरांत भडक बातम्या छापण्याची सोय झाली—खरी झळ मात्र गरीबांनाच—

नळबाजारांतील एका अंधेऱ्या दुकानांत सखू आणि तिची विधवा आई असहाय होऊन बाहेरच्या दंग्याच्या आरोळ्या ऐकत होत्या. भिंतींशीं त्यांनीं वळलेल्या विड्यांचीं बंडलें पडून राहिलीं होतीं. उपासमारीनें आणि भीतीनें या अनोळखी शहरांत त्या दोघी भेदरून गेल्या होत्या. त्यांच्या ओळखीचे शेजारी फक्त एक समोरच्या हॉटेलचे मालक—पन्नाशींची झुळूक लागलेले, त्यांच्या दूरच्या खेड्यांतही सर्व 'बाजी'बद्दल

कुप्रसिद्ध असलेले महादबा, यांनी सखूला अनेकदां घातलेली मागणी मायलेकींनी तिरस्कारानें धुडकावून लावली होती त्यानें तेही आंतून धुमसत होते. याप्रमाणें त्यांचा नेहमींचा मदतीचा मार्गही बंद झाला होता.

हल्ल्याची हूल आली म्हणजे मवाल्यांची टोळकीं गल्ल्यागल्ल्यांतून धांवत जात, कोठें तरी चोरटे हल्ले होत, अथवा दोन पक्षांची समोरासमोर लढाई होई. पोलिसांच्या शिट्या वाजल्या म्हणजे सारे गल्ल्यांत गडप !

या टोळक्यांत एक व्यक्ति मात्र उठून दिसत असे. त्याचें नांव 'सखाराम' असलें तरी 'बडा दादा' म्हणून सारे सारे मवाली ओळखत.

पीळदार बांधा, गोल गुंडाळलेलें धोतर, तांबड्या पट्ट्यांचा गंजीफ्राक, कानावर विडी आणि टोपींत आगपेटी, हातांत दंडुका, (नाहींतर त्याची मनाई झाल्यावर) कंबरेला छपलेला लांब चाकू, असा त्याचा अवतार असे.

हल्ले, लुटालूट, त्यानें ठरविलेल्या बेताप्रमाणें आपल्या मोहोल्यांच्या रक्षणासाठीं त्याचे साथीदार करीत. एखादा गरीब मनुष्य हल्ल्यांत मारला गेल्यावर त्याच्या बायकामुलांची सोय करून देणें, धोक्याच्या ठिकाणांतील गरीब बिऱ्हाडें हलवून इतर स्थळीं नेणें या कामांत सखारामाचा पुढाकार असे. इतरांचें नसलें तरी त्याचें सखूच्या दुकानाकडे लक्ष्य होतें.

दुकानावरून जातांना सखाराम खिडकींतून पावाचे तुकडे टाकून जाई— कांदा आणि हे तुकडे यांवर मायलेकींनी दंग्याच्या हलकल्लोळाचे चार दिवस काढले होते.

समोर महादबांच्या हॉटेलांचीं दारें बाहेरून बंद असलीं तरी मागल्या दारानें लपून छपून लोकांची ये—जा सुरूं असे, कप—बशांचा खणखणाट ऐकूं येई, अर्धवट अंधारांत गोंड्याच्या टोप्या चमकत......

मध्यरात्रींच्या सुमारास महादबाजवळ तांबडीं फडकीं गुंडाळलेले पांच सहा धिप्पाड मवाली बसले होते.

रुपयांचा खणखणाट झाला आणि दार बंद झालें.

महादबांनीं करड्या मिशांवरून हात फिरविला.

× × ×

दोन तासांनीं एकाएकी सखूच्या दुकानाला चौफेर आग लागली. पानें, विड्यांच्या ढिगांमुळें चटकन् आगीचा डोंब उठला.




सखू आणि तिची आई ओरडत रस्त्यावर आली.

शेजारच्या अंधाऱ्या गल्लींतील दोन मवाल्यांनीं सखूच्या तोंडावर हात देऊन तिला उचललें.

तिच्या आईनें ओरड केली—सखारामाची टोळी आग पाहून

सखारामाच्या दंडुक्यानें सखूला उचलून घेतलेला मवाली खालीं पडला. सखारामाभोंवतीं दंगेखोरांचें कडें पडलें.

लांबून पोलिसांच्या शिट्या वाजल्या.

कुठून तरी लांबून घणघण घंटा वाजवीत आगीचा मोटारबंब धांपा टाकीत येत होता. पण बंबाआधींच आगीनें आपलें काम आटपून घेतलें होतें-पोलिसांनीं जखमी लोकांना हॉस्पिटलमध्यें पोंचाविलें होतें.—सगळीकडे पुन्हां शांतता पसरली.

सखू आणि तिची आई दोघेंही दुकानाच्या जळक्या फळ्यांकडे शून्य नजरेनें पाहत उभ्या होत्या.

महादबांनीं समोरून हॉटेलची एक फळी किलकिली करून म्हातारीला हांक मारली—पांच मिनिटें त्यांचें बोलणें झालें. पदरानें डोळे पुसून सखूचा हात ओढीत तिची आई महादबांच्या हॉटेलांत शिरली.

दुसऱ्या दिवशीं मराठी वर्तमानपत्रांत मोठ्या अक्षरांत बातमी छापून आली.

## नळबाजारांत आग आणि हल्ला !

काल रात्रीं कांहीं मवाल्यांनीं एका बिडीच्या दुकानाला आग लाविली. नंतरच्या दंग्यांत 'बडा दादा' नांवानें ओळखला जाणारा मवाली सखाराम हा जखमीं होऊन हॉस्पिटलमध्यें नेत असतांच मृत्यु पावला.

दुकान जळून गेल्यानें असहाय झालेल्या मायलेकींला जवळील प्रसिद्ध 'मल्हारी' हॉटेलचे मालक श्री. महादबा यांनीं उदारपणें आश्रय दिल्या-बद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे !

---

# आठवणीची अंगठी.



### ' सर्व स्टेशनांवर उभी राहील '

खाड् खाड् पाट्या बदलीत दादर स्टेशनावरील पोर्टरनें ही पाटी वर आणली तोंच ९–४५ ची मुंबईकडील लोकल प्लॅटफॉर्मवर येऊन उभी राहिली—उभी राहिली कसली, जरा टेंकली, तोंच खर्जातल्या सुराचा भोंऽऽऽअसा आवाज काढून पुढें सरकली देखील !

—"अरे चला, या डब्यांत जागा आहे, म्हणून चार कारकून तेवढ्यांत आंत शिरलेच. समोरासमोरचे दोन बांक अडवून, तेवढ्यांत त्यांनीं खिशांतला पत्त्यांचा डाव काढून खेळाला सुरुवात केली. सकाळीं ९–४५ आणि संध्याकाळीं ५–४५ च्या ठराविक लोकलवर त्यांचा हा यांत्रिक कार्यक्रम चालू असे. एवढ्या गर्दीत, धांदलींत, खेंचाखेचींत, या पंधरा वीस मिनिटांच्या प्रवासांत यांना पत्त्याचे डाव टाकण्याइतकी एकाग्रता तरी कशी मिळते याचें मुंबईबाहेरील वाचकांना नवलच वाटेल. पण नाना आपत्ति, रोग आणि जीवनार्थ कलहाच्या गडबडींत मनुष्य सांपडतील ते सुखाचे कण वेंचून घेतोच कीं नाहीं ! "

त्यांतल्यात्यांत पंत जरा देवभोळे, फार मऊ स्वभावाचे—भिडस्त—कधीं कोणाला नाहीं म्हणायचे नाहींत. पत्त्यांचा कंटाळा आला तरी त्यांची टिंगल करण्याचा मात्र साऱ्या ऑफिसमध्यें कोणाला कंटाळा नसे. खेळाच्या भरांत त्यांची थट्टा चालू होतीच.

पंतांच्या समोरच, खेळाडूशेजारीं मळकट कपडे घातलेला, दाढी वाढलेला एक तरुण खिडकींतून बाहेर पहात बसला होता.

कोणाजवळ याचना करावी आणि कोणाजवळ नाहीं याचें अचूक ज्ञान या लोकलगाड्यांतील याचकांना असतें. त्यानें हळूच पंताच्या पायाला स्पर्श केला.

—कोणरे ? पंतांनी पत्र्यांतून डोकें वर काढून विचारलें.

—अवघड वाटतं बोलायला साहेब,......

बेकार आहे मी. दोन महिने वणवण फिरतों आहे कामासाठीं. कसें बसें जगलों आतांपर्यंत अर्धपोटीं-गेले चार दिवस मात्र पोटांत अन्नाचा कण नाहीं साहेब.

तुमच्यासारखाच पांढरपेशा होतों एकदां रेल्वेत-आतां तुमच्यापुढें हात पसरतों आहे.—

—जाऊं द्याहो पंत—नेहमींचीच आहे कटकट ही. अहो सभ्यपणें भीक मागायचा ठराविक फार्म्युलाच झाला आहे हा यांचा--पंतांचे एक मित्र सिगारेट शिलगावतांना म्हणाले—

—शुद्ध लफंगे असतात हे लोक—चैनीनें पैसा मिळवतात या धंद्यावर, दुसऱ्यानें पुष्टि दिली.

—पंतांनी त्याच्या सुकलेल्या तोंडाकडे पाहिलें. त्याच्या शरीरांतून हाडें जशीं काय बाहेर येऊं पाहत होतीं. वाळक्या, चिरा पडलेल्या ओठांवरून त्याची जीभ फिरत होती.

बोरीबंदरला कारकुनांनीं डाव आवरला—

—पंत जरा मागें राहिले—आपल्या नांवाची ऑफिसची कागदांची ब्याग उचलून ते निघाले. त्या बेकाराच्या हातांत हळूच एक रुपाया शिरला—

एका मित्रानें तें हेरलें—आणि उपरोधिक हंशा पिकला.

—अरे पंतांनीं रुपाया देऊन स्वर्गाचें तिकीट घेतलं बरं !

—अहो पंत, तुमच्या विमानाचे खूर धरून येऊं द्याल कां आम्हांला ?

ही चेष्टा साऱ्या ऑफिसला चार दिवस पुरली.

पंतांनाही कुठून आपण हा इतका हळवेपणा दाखविला असें झालें.

* * *          * * *

दुपारच्या चहाच्या अर्ध्या तासाच्या सुटींत कारकून एकत्र जमले होते.

—अहो कर्ण ! एकानें पंताला हांक मारली.

—अरे कर्ण नव्हे ‘ लंबकर्ण ’ म्हण, दुसऱ्यानें दांत विचकले. पंत मुकाट्यानें फुरक्या मारून बशींतला चहा पीत होते.

—दारांत पोष्टाचा शिपाई उभा राहिला होता. पंताचें नांव पुकारुन त्यानें एक पार्सल पोतडींतून काढलें.

—अरे पंताला देणगी आलीय् बघ ! मित्र ओरडले.

—यंव रे फक्कड ! कांहीं प्रेमाची भेट आहे वाटतं. तरीच बुड्ढी घोडी लाल लगाम—जीत्ते रहो !

पंतांनीं पार्सल घेतलें.

—तें सोडेपर्यंत साऱ्यांचा घोळका पडला होता त्यांच्याभोंवतीं.

एक सुंदर चोख सोन्याची, मध्यें तेजस्वी हिऱ्याचा खडा असलेली अंगठी त्या पार्सलमध्यें होती.



पंत गोंधळून एकदां त्या अंगठीकडे, एकदा पार्सलावरील त्यांच्या नांवाकडे निरखून पहात.

पंतांचें नांव आणि पत्ता बरोबर होता. पाठविणाऱ्याचें नांव मात्र नव्हतें. अंगठीच्या लाभाच्या जोरावर मित्रांनीं पंतांच्या नांवावर स्पेशल चहा अन् फराळाच्या चमचमीत पदार्थांची ऑर्डर देऊन टाकली.

*                    *                    *

रात्रीं निजण्यापूर्वी वर्तमानपत्राचा त्या दिवसाचा अंक वाचून झोंपण्याचा पंतांचा शिरस्ता असे. अर्धवट पेंगत वाचीत असतां पंत मधेंच आश्चर्यानें ताठ उठून बसले. मोठ्या टैपांत खालील मजकूर अंकांत होता.

**—अंगठीचें रहस्य—**

प्रसिद्ध जवाहिऱ्ये—कं. यांच्या दुकानांतील एका मौल्यवान् अंगठीच्या चोरीची बातमी आम्हीं आपल्या वाचकांना दिलीच आहे. काल या बाबतींत एका बेकार गृहस्थाला पोलिसांनीं चौपाटीवर संशयावरून अटक केली. अंगठ्यांना बांधतात तशी हजार रुपयांचा आंकडा लिहिलेली दोऱ्यासहित लहान हिरवी कार्डबोर्डची चिट्ठी मात्र त्याच्या खिशांत सांपडली—अंगठीचा अद्याप पत्ता नाहीं.

मानवी वर्तनाच्या रहस्याचा विचार करण्यांत पंतांना रात्रभर झोंप आली नाहीं.

---

# चित्रकाराचें रहस्य



एका शहरांत एक प्रख्यात चित्रकार रहात असे. एका विशिष्ट प्रकारच्या चित्रांबद्दल त्याची ख्याति असे. दुसऱ्या अनेक चित्रकारां-जवळ अत्यंत मौल्यवान् रंग होते. त्यांचीं चित्रें हीं याच्या चित्राहून मोठालीं आणि अधिक प्रभावशालीं असत. या चित्रकाराच्या सर्व चित्रांत मुख्य रंग एकच असे. डाळिंबी तांबड्या रंगाची अशी एक सुंदर छटा त्याच्या चित्रांवर असे कीं सारे लोक तिच्यावर मोहित होत. सारे उद्गारत——

' काय सुंदर रंग हा ! '

इतर चित्रकारांना त्याचा हेवा वाटूं लागला.

' आणतो तरी कुठून हा असला रंग ? '

ते आपसांत कुजबुजूं लागले. त्यांनीं टेहळणी, चौकशीचे, सारे प्रयत्न करून पाहिले; परंतु त्यांना या रंगाचें रहस्य उलगडलें नाहीं. शेवटीं त्यांनीं प्रत्यक्ष चित्रकारालाच विचारलें.

त्यानें नुसतें स्मित केलें.

—'माफ करा, मला सांगतां येत नाहीं तें !'

एवढेंच बोलून पुन्हा खालीं मान घालून तो आपल्या कामाला लागला.

साऱ्या चित्रकारांनीं त्याच्या या रंगावर मात करावयाचें ठरविलें. एका श्रीमंत चित्रकारानें दूरदूर देशांतील अत्यंत मौल्यवान् असे रंग आणविले आणि त्यांचा उपयोग करून एक झगझगीत चित्र रंगविलें, पण थोड्याच वेळांत तो रंग फिका दिसूं लागला.

एका विद्वान् चित्रकारानें चित्रकलेच्या रंगावरील सारे नवे जुने ग्रंथ पालथे घालून जारीनें संशोधन करून एक रंग हुडकून काढला आणि त्यानें आपलें चित्र रंगविलें; परंत तो रंगही अगदींच फिका दिसूं लागला.

साऱ्यांनीं हात टेकले त्या चित्रकाराच्या कलाकृतींपुढें.

त्याला मात्र या प्रकाराची दादही नव्हती. त्यानें आपला व्यवसाय चालू ठेवला.

दिवसेंदिवस त्याच्या चित्रावरचा रंग अधिक तांबडा जर्द आणि खुलून दिसूं लागला. परंतु तो स्वतः मात्र अधिकाधिक खंगत चालला होता.

एके दिवशीं इतर चित्रकार त्याच्या भेटीला आले असतां त्याच्या चित्रफलकापुढें त्याचा मृतदेह पडलेला दिसला. शेवटपर्यंत त्याच्या हातांत कुंचली होती आणि फलकावर लालभडक रंगांत रंगविलेलें एक अपूर्ण चित्र होतें.

साऱ्या चित्रकारांनीं अत्यंत उत्सुकतेनें आणि अधिरतेनें त्याच्या खोलीची कसून झडती घेतली. त्याच्या रंगाच्या कुप्या, कुंचले, रंगाचे



सांठवणींचे डबे, सारें सारें बारकाईनें तपासून पाहिलें. परंतु त्याच्याजवळ नव्हतें असें कोणतेंही साहित्य, कोणताही रंग त्यांना शोधूनही मिळाला नाहीं.

त्यांनीं अंत्याविधीसाठीं त्याचे फाटके कपडे त्याच्या देहावरून काढले, आणि मूल्यवान् कापड त्याच्या कलेवरावर घातलें. तेव्हां त्याच्या छातीच्या वरच्या भागावर एक खोल जखम त्यांना दिसली. किती तरी वर्षांची जुनी असावी, तरीही अजून रक्ताळलेली दिसत होती ती.

एवढ्या मोठ्या जखमेची वाच्यता न करतां आपली कलोपासना सुरू ठेवल्याबद्दल साऱ्यांनीं त्याची मुक्तकंठानें प्रशंसा केली. परंतु त्या जखमे-मागील रहस्य कोणालाच कळलें नाहीं.

स्मशानांतून परत जातांनाही प्रत्येक दुसऱ्याला विचारीत होता.

—तें सगळं खरं, पण त्यानें तो रंग आणला होता तरी कुठून—अन् तो सांपडला कसा नाहीं आम्हाला !

अनेक वर्षे लोटलीं.

कालांतरानें त्या चित्रकाराचें नांवही विस्मृतप्राय झालें, परंतु त्या रहस्यमय रंगानें रंगविलेलीं त्याचीं चित्रें मात्र अजून अजरामर होऊन राहिलीं आहेत.

( ' ऑलिव्ह श्रीनर ' यांच्या एका कथेवरून. )

---

# अहिंसेचा बळी !

चांदणें किती सुंदर पडलें होतें !

आतां गोपाळाचें हृदय समाधानानें फुरफुरत होतें. एखाद्या मोठ्या संकटांतून सहीसलामत पार पडावें म्हणजे होतो तसा आनंद त्याला होत होता. खेड्यांतल्या खडकाळ, धुळीनें भरलेल्या अरुंद रस्त्यांतून तो भरभर चालला होता. एका हातांत काठी, दुसऱ्या हातांतील एका लांब चिमट्यांत वळवळणारा हातभर लांब, मनगटासारखा जाड साप त्यानें धरला होता.

त्याच्या घरांतच निघाला होता तो.

त्याच्या आळीकरांचें तसें मत पडलें म्हणून तो साप गांवाबाहेर टाकून येण्यास गोपाळ भरभर चालला होता. त्यानें गांवाच्या सीमेबाहेर त्याला जोरानें फेंकून दिलें. चांदण्यांत सळसळ करीत बाजूच्या झुडपांत तो साप क्षणांत अदृश्य झाला.

गोपाळानें कपाळचा घाम पुसून सुस्कारा सोडला. त्याचें घर बचावलें होतें.

" तो परत आल्यावर आळीकरांनाही समाधान वाटलें. चला बरें झालें. हत्या न करतां सारी आळी बचावली. "

—हो, अन् पुण्यही पदरीं पडलें असेल जीवरक्षणाचें ! चांदणें किती सुरेख पडलें होतें !

× × ×

सकाळीं गोठ्यांतल्या गाई घेऊन काठी घोंगडी खांद्यावर टाकून लावणी ललकारीत गोपाळ गांवाबाहेर रानाकडे चालला होता.

गांवाच्या शिवेजवळ महारवाड्याजवळ रखमा महारीण मुठीएवढे डोळे करून धाय मोकलून रडत होती. गोपाळानें काठी खालीं टेकली.

—काय झालंग रडायला ? त्यानें विचारलें.

साऱ्या म्हारवाड्यावर येवच रुसला दादा! पंधरा दिवस झाले नाहींत माझी सोनतुकडी गाय मेली बगा, अन् आज पगतें तो तर ही एकली व्हाल्येली म्हैस—



गोपाळानें बाजूला पाहिलें—

हत्तीच्या छाव्यासारखी पुष्ट, काळीकुळकुळीत भरदार म्हैस चार पाय लांबवून लांकूड होऊन कुशीवर पडली होती.

—काय झालं एकाएकीं मरायला ? गोपाळनें विचारलें.

—एकाद्या जीवाणूचे–सापाचे–दांत उटल्यांत पगा पायावर—

—आँ–साप–अरेरेरे–गोपाळाच्या तोंडून आश्चर्यानें आणि दुःखानें उद्गार निघाला—

त्याला कसेंसेंच वाटूं लागलें—

पण रखमाची नजर भिडण्याआधींच खालीं मान घालून तो निघाला.

काठी खांद्यावर टाकून—

अग हो हो–पवळीऽ–पवळीऽऽ–

म्हणून हांक मारून जवळजवळ पळतच तो पुढें सरकला—
मेलेली म्हैस—आणि जीवंत असून मेलेली महारीण रखमा—
त्यांच्यावर सूर्याचीं किरणें किती लख्ख पडलीं होतीं !

——

# चांदीची वाटी



कड्, कड्, कड्, कड्—

कुणाला वाटेल वीजच पडली.

पण त्या फक्त रावबहादुरीणबाई नोकरावर राग काढीत होत्या—

—मेल्या, आधीं वाटी काढ ती चांदीची, कुठें दडवून ठेवलीस ती—नाहींतर पोलीसच्या ताब्यांत देतें आत्तां.

—पण बाईसाहेब, अगदीं गळ्याशपत, पोराबाळांची शपत घेऊन सांगतों पगा, म्या उचलली नाय् वाटी.

—तसा नाहीं ऐकायचा, शिरजोर मेला—ऐकलंत कां ? इकडे यायचं जरा.

शेवटचे शब्द रावबहादुरबाईंनीं तार सप्तकांत फेंकले. सबजज्ज रावबहादूर माडी खालीं उतरले.

—अग पण आहे काय गडबड ?

—गडबड ? – तुम्हांला हज्जार वेळां सांगितलं कीं माझ्या घरांत असला अनोळखी चोरटा गडी नको – चांगला माहेरून आणला होता तर—

... ( तुमचे कायदे आणि कोर्टं करूं देत स्त्रियांच्या हक्काची चर्चा—रावबहादुरीणबाई शब्दागणिक ' माझं घर ' याशिवाय पाऊल टाकीत नसत – या हक्काबद्दल कोणत्या कोर्टानें निवाडा दिला होता असें स्मरत नाहीं. खुद्द रावबहादूर या तोफखान्यापुढून पळ काढीत. )

——अग पण झालं काय तें तर सांगशील ?

अहाहा ! इतकं तोंड झिजलं माझं अन् आतां विचारायचंय्, 'काय' झ्यालं ! या तुम्ही लावलेल्या गड्यानें माझी चांदीची वाटी चोरली. दुसरं कांऽऽहीं नाहीं !

गड्यानें हात जोडले——

म्या हात बी लावला नाय् वाटीला मालक—गरीब असन मी, पन् चोरीची दानत नाहीं माजी——

——शिंच्याऽऽ! पुन्हां मुजोरपणा करतोस चोरी करून !

रावबहादुरांनाही आतां अवसान चढत होतें.

कमरेवर दोन हात देऊन रणचंडीच्या आवेशानें रावबहादुरीण बाई त्यांच्या मागें उभ्या होत्या—कमी पडल्यास कुमक द्यायला—

——अस्सा नाहीं ऐकायचास——

रावबहादुरांनीं काठी घेतली हातांत——

आज वाटी चोरलीसऽउद्यां दागिने चोरशीलऽ.

वाक्याच्या तालावर गड्याच्या पाठीवर दोन तांबडेलाल वळ उठले—

दिंडी उघडून एक गडी आंत आला. त्याच्या डोक्यावर करंड्या होत्या फळांच्या.

रावमादुरांचा वाडा हाच व्हय् ?

हो – कोणरे तूं – कोण हवंय् ?

त्या महादबा पाटलांचा मी मुलगा. आमचा जमिनीचा तंटा चाल्लाय् नव्ह का—म्हंजे पगा –

बरं बरं—पुरे—ठेव आंत अन् जा—कचेरींत ये.

करंड्या ओसरींत ठेवून मुलगा परत वळला.

रावबहादुरीणबाई पुन्हां गर्जल्या——

पहा पहा ! कसा उभाय् खांबासारखा—

मेल्या, ओसरींत दिसताहेत करंड्या पण घरांत ठेवायची आहे का शुद्ध——

गड्यानें मुकाट्यानें करंड्या आंत नेऊन ठेवल्या—

हं—मग, बोल—दास्तीव कुठें आहे वाटी—



—भांड्यांत आली असेल मालक, पुन्हां एकदां पगा घरांत.

—मेल्या ! मलाच चोर ठरवतोस काय ? बाईसाहेब ओरडल्या.

खिडकीजवळ पत्र्यावर घासून ठेवलेल्या भांड्यांतील एका पातेल्याच्या काठावर एक कावळा आनंदानें काव् काव् करीत बसला होता.

जणूं काय एक बडा चोर छोट्या चोराला कसा धमकावीत आहे याबद्दल तो चेष्टाच करीत असावा.

बाईसाहेबांच्या तार सप्तकांतील उद्गारानें तो कावळा जोरानें काव् काव् करून उडून गेला—

त्या धक्कानें तें पातेलें गडगत खालीं आलें आणि त्यांतून एक चांदीची वाटी रावबहादूर व रावबहादुरीणबाई यांच्या मध्यें येऊन पडली !

—आणि बिचारा गडी त्यांच्याकडे पहात उभा होताच.!

( * गुजरातचे प्रतिभासंपन्न कथालेखक श्री. ' धूमकेतू ' यांच्या 'जीवन-चक्र' या नव्या कथासंग्रहांतील दोन लघुतम कथांच्या आधारें 'अहिंसेचा बळी ' व सदर कथा या इकडील आचारविचारांशीं जुळवून घेऊन नमुन्या-साठीं अनुवादिल्या आहेत. श्री. धूमकेतू यांनीं या कथाप्रकाराला ' प्रसंग-चित्रें ' असें नांव दिलें आहे. )

---

# 'प्रीतिची तऱ्हा'—



साऱ्या कॉलेजांत उनाड फुलपांखरूं म्हणून प्रसिद्ध असलेली सुधा दोन तास आंकड्यांनीं भरलेलें अर्थशास्त्राचें पुस्तक कां वाचीत बसली आहे याचें तिच्या खोलींतील मैत्रिणीलाही गूढ वाटत होतें.

गम्मत म्हणून तिचे डोळे झांकण्यासाठीं ती तिच्या खुर्चीमागें हळूंच जाऊन उभी राहिली तों तिच्या तोंडून आश्चर्याचा उद्गार बाहेर पडला.

—अय्या !

त्या पुस्तकांत दोन फोटो होते, आणि सुधा दोन तास त्या फोटोंचाच अभ्यास करीत होती.

सुधा आणि आंकड्यांचें अर्थशास्त्र यांचा जितका विरोध तितकाच विरोध वसंत आणि सदाशिवाच्या फोटोंत होता.

वसंत म्हणजे साऱ्या कॉलेजांतील सामन्यांतला चँपियन.

उमदा, आकर्षक, सुटा—बुटांतला, तिचा टेनिसचा पार्टनर.

" टेनिसचा पार्टनर कां जन्माचा पार्टनर ग ! "

म्हणून रेसिडेन्सींतील साऱ्या मुली तिची चेष्टा करीत.

उलट सदाशिव म्हणजे खरोखरच सांबाचा अवतार होता.

—काचा मारून नेसलेलें जाड सोलापुरी धोतर, आंगच्या कॉलरचा ' हरक'चा शर्ट, आणि चौकडीचा ' मद्रास ' चेकचा कोट. डोळ्याला चष्मा अन् पायांतल्या जाड वहाणांकडे पाहून चालण्याची संवय.

सुधेची ओळख दोघांशींही होती. टेनिससाठीं ती वसंताबरोबर फिरत असेच.

वर्षाकाठीं अभ्यासाची लहर आली म्हणजे सदाशिवानें साऱ्या लाय-ब्ररीचें ताक घुसळून काढलेलें टिप्पणींचें लोणी नेमकें तिच्या टेबलावरल्या बशींत !

चार वर्षें असा प्रकार चालला होता.

बी. ए.च्या परीक्षेचा फॉर्म भरला कीं बहुतेक साऱ्या विद्यार्थ्यांना कॉलेजची इमारत परक्या धर्मशाळेसारखी वाटूं लागते. परीक्षा आणि जगांतील जीवन यांची ओढ त्यांना लागते.

आजच कॉलेजची कोर्टें वर्षासाठीं बंद होण्यापूर्वी शेवटला टेनिसचा सेट खेळून सुधा आणि वसंत टेकडीवर फिरावयाला गेले होते.

तळाशीं पसरलेल्या रेसिडेन्सीच्या रांगा, कॉलेज आणि ॲंफि–थिए-टरच्या उंच माथ्याकडे ते टक लावून पहात होते. चार वर्षांचें सुखी, बेफिकीर जीवन त्यांच्या डोळ्यापुढून सिनेमा–फिल्मसारखें जात होतें.

सुधा !

वसंतच्या हांकेतील कांहीं नवीन कंपानें ती दचकली.

—सुधा, चार वर्षे झालीं आपली ओळख होऊन—कायमचीच होईल ही ओळख ?

—वसंत, खरं सांगूं इतक्यांत लग्न करायची माझी इच्छा नाहीं.

—अस्सं ! मग काय करणार ? होणार एखादी मास्तरीण काकू, अन् शेवटीं कंटाळून एखाद्या बेकार वकीलाशीं नाहीं तर श्रीमंत सरकारी नोकराशीं लग्न करणार ना ?

कां उगीच चाळवण्या दाखवतेस ? माझं प्रेम......

—मी अगदीं भांबावून गेलें आहे वसंत, विचार करायला वेळ पाहिजे मला.

—अच्छा, उद्यां भेटूंच आपण......



परत जातांना किलबिल करीत जाणारी मुलींची एक टोळी त्यांना वाटेंत भेटली, आणि त्यांच्या हंसण्या–खिदळण्यांत सुधा केव्हां मागें राहिली याची जाणीवही वसंताला राहिली नाहीं.

प्रत्येक मुलीच्या बोलण्यावर कांहींतरी कोटी करीत, रॅकेट फिरवीत चाललेल्या वसंतच्या पाठमोऱ्या मूर्तीकडे सुधेनें पाहिलें–कां कोण जाणें, तिला कांहींतरी हुरहुर आणि खिन्नता वाटूं लागली.

बाजूच्या टेकडीला वळसा घालून ती रेसिडेन्सीकडे वळणार होती. क्षितिजाच्या कडेवर पौर्णिमेचा चंद्र नुकताच डोकावत होता, आणि त्याचे समांतर किरण अंधुक अंधारांत चंदेरी तीरासारखे सरसावत होते. त्या प्रकाशांत झाडामागें तिला एक अस्पष्ट मनुष्याकृति दिसली–ती जरा दचकली–तिनें निरखून पाहिलें.

कोण सदाशिव ! ती उद्गारली.

· तुम्ही कसे मोकळे या वेळेला ! शेक्सपीयर नां चॉसर वाट पहात असतील तुमची......

· —शब्द हे मनोविकार लपविण्याचीं साधनें आहेत असं कुणीतरी म्हटलें आहेच नाहीं !

· सदाशिव मुकाट्यानें चष्म्याच्या कांचा पुशीत ग्वालीं पहात उभा होता.

—कुठें तरी दूर चांदीच्या लहानशा मंजुळ घंटा वाजाव्यात, तसे बारीक आवाजांतले 'गुड नाइट् गुड नाइट्' असे शब्द वाऱ्यावर तरंगत येत होते—वसंताचा पुरुषी आवाज उत्तरादाखल आला.

सुधा !—सदाशिवानें हांक मारली—

चार वर्षें झालीं आपली ओळख होऊन—

कायमची होईल का ही ओळख ?

मला तुझी फसवणूक करायची नाहीं—मी फारसा श्रीमंत नाहीं, चार मुलें मुली भोंवतीं घोटाळत ठेवण्याची आकर्षक कलाही माझ्याजवळ नाहीं. आहे हा साधासुधा जीव तुझा आहे. तुझ्याशिवाय कोणाला त्यांत स्थान नाहीं. मला तुझ्या प्रेमाचा आधार दे—चल जगांत कांहीं तरी चांगल्यासारखें कार्य करून दाखवूं आपण......

× × ×

वसंतसारख्या सुस्वरूप, श्रीमंत, हौशी तरुणाला नकार देऊन सुधा साध्यासुध्या सदाशिवाची पार्वती कां बनली याचें साऱ्या कॉलेजच्या मुलांमुलींना अजून गूढ वाटतें.

सुधेच्या मुग्ध नेत्रांत मात्र त्याचें उत्तर सांपडतें.

—आणि ती अजून हंसून गुणगुणते—

" प्रीतिची तऱ्हाच उलटी असे. "

---

# 'स्त्रीजात तेवढी



होय !—ऐकलं कां ! काय म्हणतें मी ! ...

· —दोन तास झाले. वसंतराव लघुकथालेखनांत दंग झाले होते. दारामागून मोठ्यानें दिलेल्या जांभया, सांकेतिक नांवाचा उपयोग, सारे प्रकार झाले पण व्यर्थ—

शेवटीं रागानें कुसमुसत ' जाऊन येतें मैत्रिणीकडून ' म्हणून मालतीबाई रागानें दार लोटून बाहेर पडल्या.

वसंतरावांची लघुकथा संपत आली होती. भग्नहृदय नायक आवेशानें किंकाळत होता.

' स्त्रीजात तेवढी—

खण्—खण्—खण् ...

दाराची कडी वाजली.

कोण आहे ! वसंतरावांनीं त्रासून विचारलें.

पोस्टमन — एक पत्र भिरकावलें गेलें.

काय त्रास आहे ! म्हणत वसंतरावांनीं उठून तें पत्र उचललें. त्यांच्या पत्नीचा पत्ता त्यावर असून कोंपऱ्यांत ' खाजगी ' अशीं अक्षरें होतीं. ...

वसंतरावांना मागील प्रसंग आठवले.

तीन चार वेळां आपण घेण्याआधींच तिनें खरकट्या हातानें पोस्टमनजवळून तीं पत्रें घेतलीं, आणि ट्रंकेंत दडवून ठेविलीं.....

समोरच्या कागदावरचे ओले शब्द त्यांच्या मनांत घुमूं लागले.

—स्त्रीजात तेवढी ... ..

पुढील शब्द ' निमकहराम ' म्हणून लिहिण्यासाठीं त्यांनीं टाक उचलला, पण तो खालीं ठेवून निश्चयानें तें पत्र फोडलें.

... " माझ्या मालतीस,

नव्या संसारांत तुझ्या सुधीरामाला विसरलीस वाटतें ! किती आणाभाका झाल्या होत्या कॉलेजांत आपल्या कीं आपलें प्रेम हृदयांत गुप्त पण चिरंजीव ठेवूं म्हणून !

मी बुधवारीं मुंबईस येणार आहे. दुपारीं एकटीच असशील तूं, तेव्हां भेटून जाईन,

तुझाच
सुधीराम.''

दिसतो आहे कोणी तरी परदेसी सैंया—या कॉलेजच्या मुली ! वसंतरावांनीं सिगारेट शिलगावली.

तिच्या धुरांत त्यांना नाहीं नाहीं तीं दृश्यें दिसूं लागलीं.

कांहीं नाहीं—स्त्रीजात तेवढी

त्यांच्या डोळ्यांवर मृदु, गौर, अंगुलींची गोड मिठी बसली.

—त्यांनीं रागानें तो हात झिडकारून आगीचे डोळे रोखले.

—' इतकं कां रागवायचं जरा बाहेर गेलें तर ! '

—आधींच हिला पत्ता लागूं द्यायचा नाहीं—आतां बुधवार ! असा विचार करून वसंतरावांनीं क्रूर मौन धरलें होतें.

रात्रीपर्यंत मालतीबाईचें तोंड गोरेमोरें झालें होतें—रात्रभर उसाशांचे आवाज आले, पण वसंतरावांनीं दगडाचें हृदय करून एका शब्दानें खुलासा केला नाहीं.

÷ ÷ ÷

शेवटीं बुधवारची दुपार आली.

आज वसंतराव ऑफिसांत वेड्यासारखे झाले होते.

तीन वाजतां रजा काढून ते निघाले.

—ए टॅक्सी ! आज ट्रामचा धीर त्यांना कुठला ? मांजराच्या पावलांनीं दबत ते दाराजवळ गेले. तें आंतून बंद होतें.

हळू बोलण्याचा, हंसण्याचा, बांगड्यांचा आवाज आंतून येत होता.

—दार उघड ! ! वसंतराव गर्जले.

—कोण आहे तें ?—मालतीबाईचा आवाज आला.

उघडतेस दार, कां मोडूं लाथेनें ? दारावर काठी बसली.



—अहो पण हळू, झालंयू काय तुम्हांला—शेजारी काय म्हणतील ?

—तेंच दाखवतों तुला—उघडतेस कां ?...

—आंतून बोल्ट निघाला.

—हरामखोर—मेलास आतां ...

म्हणून ते काठी उगारून आंत धांवले—

—समोर आरामखुर्चीवर एक तरुण स्त्री बसली होती. तिची भयानें बोबडीच वळली—

अगबाई ! मालती ! कोण हा ? दारुबिरू प्यालेला आहे वाटतं ?

वसंतराव बेफामपणें बरळत होते—

—कुठें लपविलास त्याला, बोल !

—कुणाबद्दल बोलायचं ? कुणाला लपविलं मी ;

मालतीबाई रडकुंडी येऊन म्हणत होत्या—

—तो—तो—सुधाराम ! बोल—नाहीतर खून पाडतों तुझा !

——त्यांनीं खिशांतलें पत्र तिच्यापुढें केलें——

——वाच ! वाच !! चांडाळणी– !!!

——समोरची स्त्री ताडकन् पुढें झाली.

——अगबाई ! हें तर माझेंच पत्र !–तरीच मालती: म्हणत होती तिला मिळालं नाहीं म्हणून——

मीच येणार होतं तिला भेटायला——

——अन्, मग तो सुधीराम ?

——अहो, माझं नांव सुधा,–मालती अन् मी कॉलेजांत जिवाच्या मैत्रिणी–तिनं मला प्रेमानं 'सुधीराम' म्हणावं, आणि म्हणून तिच्या पत्रांत मीहि तशीच सही करीत असे.

——कुठला राईचा पर्वत करून डोक्यांत राख घातलीत असेंच पुरुष तुम्ही–म्हणूनच लग्न करीत नाहीं मी मालती, समजलीस !

+ + +

——रात्रीं टेबलावर वसंतरावांच्या गोष्टीचें अर्धें वाक्य अजून फडकत होतेंच.

——' स्त्री जात तेवढी——'

——" बहुधा प्रेमळ आणि सरळ असते, नसल्यास त्याचा दोष पुष्कळदां पुरुषांकडेच जातो– "

असें वाक्य पुरें करून वसंतरावांनीं दिवा मालविला——

---

# आशा निराशा



आमचे आनंदराव—आपल्या नांवाप्रमाणें आनंदी होते, आणि त्यांच्याकडे पाहून इतरांनाही इतका आनंद होई कीं, ते अगदीं खो! खो! हंसू लागत!

मग मात्र त्यांना जरा राग येई —

लठ्ठ मनुष्यांचा जन्म दुसऱ्यांना हंसविण्यासाठींच आहे कीं काय अशी त्यांना शंका येऊं लागे—

शिराळशेटासारख्या त्यांच्या ऐसपैस देहांत एखाद्या 'मजनू' किंवा 'फरहादचा' आत्मा तळमळत होता, पण तिकडे लक्ष्य देतो कोण— !

त्यांच्या शेजारच्या बिऱ्हाडांतील नर्स 'आशाबाई' वर त्यांचा फार जीव जडूं लागला होता.

दोघेंही एकटे फटिंग असल्यानें संध्याकाळीं गप्पा मारीत, परंतु प्रेमी जिवाच्या पावित्र्यांत आनंदरावांनीं प्रणयाची व लग्नाची गोष्ट काढली म्हणजे मात्र आशेला मधेंच खोकल्याची उबळ येई, आणि तोंडाला पदर लावून ती निघून जाई. आनंदरावांच्याही लक्ष्यांत ही गोष्ट आली.

आपलें अडीचशें पौंडांचें वजन कमी करण्यामागें ते लागले. कथा-कादंबऱ्यांतल्या प्रेमी जनांना मोठमोठ्या आपत्तींशीं झगडावें लागलें हें त्यांनीं वाचलें होतें, परंतु स्वतःच्या देहाशींच झगडणारा प्रणयवीर हा पहिलाच असावा!

लोक हंसतील म्हणून भल्या पहाटेस, अंधारांतच चड्डी चढवून मैदाना-भोंवतीं पळण्यास त्यांनीं सुरुवात केली.

—पकडो! पकडो!! पकडो!!!

त्यांना पळतांना पाहून दंडुका देऊन एक पोलिस ओरडत त्यांच्या मागें लागला, आणि अंधाऱ्या पहाटेस मुंबईत धुमाकूळ घालणारा 'मांजर-चोर' हाच म्हणून त्यानें छातीला हात लावून सांगितलें. लोकांच्या

घोळक्यांतून कशीबशी सुटका करून घेतांना आनंदरावांना मेल्याहून मेलें झालें.

" टर्किश बाथ " नें वजन कमी होतें म्हणून त्यांनीं वाचलें—

एका इमारतीवरील बाथचें नांव वाचून ते आंत शिरले.

— रंगविलेल्या तोंडा—ओंठाच्या एका मडमेनें लचकून, मुरडून त्यांचें स्वागत करून पडद्यापलीकडे आंत चलण्याची खूण केली—–

' टर्किश बाथ ' शिवायच नखशिखांत घामाघूम होऊन आनंदरावांनीं बाहेर धूम ठोकली !

—–आठ दिवस उपास करून पाहिले त्यांनीं—-

त्या दिवसांत कमी झालेलें वजन उपासानंतरच्या दोन दिवसांतच शिग भरून ओसंडून जाऊं लागलें—

मेद कमी करणारे फिरते विजेचे पट्टे, क्षार, औषधें, टोंचण्या, साबण सारे उपाय थकले—–

चौपाटीच्या वाळूवर पडून एका रात्रीं त्यांनीं एका पुरभैयाकडून चंपी देखील करून घेतली, पण उशाशीं काढून ठेवलेल्या कोटांतलें पाकीट गुप्त झाल्यानें, त्यानंतर पैसे नसल्यानें खास नवी कडक चंपी खाऊन ते चाळीवर परतले—

ठराविक गप्पांची बैठक साजरी करण्यासाठीं आशेच्या खोलीकडे वळतात तों तिनें तिमजली हंशाची साथ देऊन दार लावून घेतलें, आणि तिच्या टेबलावरील एक हॅट् आणि काठीचें ओझरतें दर्शन त्यांना मिळालें—–

आनंदराव आतां अगदीं निराश झाले—ऑफीस, खानावळ आणि खोली याखेरीज ते बाहेर पडत नसत.

—–आतां त्यांच्या खोलींत धूप जळूं लागला, आणि आशेचा फोटो जाऊन त्या जागीं श्रीकृष्णाची तसबीर आली.

—–त्यांच्या डोक्यावरच्या भांगदार केसांना रजा मिळाली, खोलीं-तल्या मोठ्या आरशावर देखील पांघरुणाचा पडदा पडला. आरसा भरून पलकिडे अदृश्य होऊन ओसंडणाऱ्या देहाच्या प्रतिबिंबाची त्यांनाच शिसारी येऊं लागली होती.

* * *

चार महिने प्रेमभंगाच्या यातना ते अनुभवीत होते.

एके दिवशीं रात्रीं आठाचा सुमार होऊनही अंधारांत ते तसेच आरामखुर्चीवर अंधारांत नजर लावून शून्यपणें पडले होते--

हळूंच मागून त्यांचे डोळे झांकले गेले.

---ते दचकले---

कोण ?--काय आहे ? ते अडखळले---चार महिन्यांपूर्वीच्या प्रश्नाचें उत्तर---

त्यांच्या कानाशीं 'होय' असा हळूंच शब्द आला.

---स्वप्न आहे झालं.

निराशेनें ते भेसूर हंसले. साऱ्या जगानें माझ्या हत्तीसासारख्या देहाकडे पाहून हंसून टवाळी करावी एवढ्यासाठींच माझा जन्म--माझं कुठलं भाग्य !

---इश्श -- भलतंच--

आशेनें स्विच् दाबून दिवा लावला, आणि आरशावरील पडदा दूर करून आनंदरावांना पुढें उभें केलें.

पूर्वी कापसाच्या लोडासारखा ऐसपैस फुगलेला त्यांचा देह प्रेमभंगाच्या निराशेच्या तडाख्यांनीं पिंजून पिंजून अगदीं सडसडीत झाला होता ! !

तुमचे सारे उपाय थकले म्हणून निर्वाणीचा हा उपाय करून पाहिला मी---

' क्षमा करायची ना मला ? ' आशा म्हणाली.

---चार महिन्यांनंतर प्रथमच आनंदानें हंसले आनंदराव.

---ती निराशा झाली म्हणूनच ही आशा मिळाली ना ?

म्हणून त्यांनीं तिचें तोंडच बंद करून टाकलें--- !

---

# विस्कटलेला संसार?



दादा ऽ — दादा ऽ — आई ग !

सहा वर्षांची कुसुम रडत, वेदनांनीं थरथरत येऊन रामरावांच्या अंगाला बिलगली.

—काय झालं ग कारटे, विवळायला !

लालभडक डाग पडलेला हात तिनें पुढें केला.

—चंद्राबाईनीं डाग दिला दादा—मी कांहीं केलं नव्हतं, नुसतं तिला सांगितलं, सत्यंकाकू नळावर बोलत होत्या त्या—कीं चंद्राबाईच्या छळानं आई मेली म्हणून—अन् तिनं एकदम डाग दिला हो......

...खोलींत केर सांचला होता. फुटक्या तसबिरी तिरक्या होऊन भिंतींशीं लोंबत होत्या. मोडक्या खुर्च्या, फाटकें जाजम, खिळखिळा पलंग, सारं श्रीमंत संसाराचे भग्न अवशेष भोंवतीं पसरले होते.

समोर भिंतीवर सीताबाईची—त्यांच्या मृतपत्नीची एक रडवी तसबीर टांगली होती.

कुसुमच्या रड्यानें संतापून तिकडे पाहून रामराव ओरडले—

—मेलीस तरी पिच्छा सोडीत नाहींस अजून आमचा—

खळ्—

काठीच्या तडाक्यानें तसबिरीचे तुकडे झाले—

त्यांच्या मागचें दार उघडलें.

—कपाळावर ओढून वळेंच वळविलेले केंस, विड्यानें रंगलेले ओठ, बिनगळ्याची, अर्धी छाती उघडी टाकणारी चोळी, तलम भडक छापाचें पातळ, या थाटांत चंद्राबाई हातांत बॅग घेऊन तणतणत उभी होती.



—ही चाललें मी !

—चांगलं केलंत हो !—माझा गळा गांवलांत तुम्हीच, पण सारं जग थुंकतय् माझ्यावरच ! मी मारलं का तुमच्या बायकोला ? तुम्ही तिला गुरासारखं बडवावं, उपाशी ठेवावं, दुखण्यांत कुत्र्यासारखं कोंपऱ्यांत टाकून तडफडत मरूं द्यावं—ही करणी तुमची, पण सारा दोष माझ्यावर—तुम्ही पुरुष आपले नामानिराळे !

...अन् ही तुमची कार्टी. आतांपासूनच दुसऱ्याचं ऐकून चुरुचुरु बोलायला लागली मला—हें सारं मी इथं राहिलें म्हणून—

आतां जाऊन राहतें कुठें तरी क्षेत्राचे ठिकाणीं, ठेवलंय् मागं तुम्हीं नांवावर तेवढें पुरें मीठभाकरीला मला—

आणि आतां तुमच्या भिकेच्या संसारावर माझं ओझं नको—

...काय पुरवणार आहांत हौशी तें कळतंय्—दमडी नाहीं उरली !

रामराव डोळे फाडून पहात होते.

...अग हो पण ! हा काय वेडेपणा ? कोण बोलतोय् तुला—जीभ हासडून काढीन एकेकाची ! मी वाटेल तें करीन—मोकळा आहे मी माझा—उद्यां राजरोस लग्न लावून सभांतून मिरवीन तुला.

—कांहीं नको—जाऊं द्या मला—

—नाहीं जाऊं देणार !—तुझ्यासाठीं पाहिल्या संसाराला काडी लावली मी—बायकोला छळून मारली, अन् आतां तूं गेल्यावर ?

—शोधा दुसरी—व्हा दूर !

चंद्रा, नको जाऊं ग—कोण आहे तुझ्यावांचून मला ?

—लग्नाची बाईल पुरली नाहीं जन्माला: मी कुठून पुरणार ? व्हा दूर !—तिच्या धक्क्यानें कोलमडून रामराव जमिनीवर पडल्या पडल्याच मोठ्यानें रडूं लागले—सीता!—सीता ! माझी गुणाची सीता ! !

× × ×

हें काय ?

—उठायचं ! उठायचं कीं ! रडायला काय झालं ? झोपेंत—कुसुम दचकेल हो—

कोपऱ्यांतल्या फाटक्या घोंगडीवरून उठून सीताबाई रामरावांना गदगद हलवून जागें करीत होत्या—

रामरावांच्या अंगाला घाम सुटला होता—डोळ्यांतून आंसवांचे पाट वहात होते—तोंडांतून भेसूर रडण्याचा आवाज येत होता.

...ते दचकून उठून बसले...

—कोण सीता ? माझी सीता—जीवंत आहेसना तूं ?—स्वप्नच होतंना तें—खरं सांग...

...पश्चात्तप्त प्रेमाच्या आवेशानें त्यांनीं तिला जवळ घेतलें...

गेल्या रात्रीं चंद्राकडून आल्यावर कडी काढायला उशीर झाल्यामुळें सीताबाईच्या कोपरावर सणकून लाथ बसली होती—त्याला धक्का लागून त्यांच्या तोंडून वेदनेचा उद्गार निघाला...

ती हाय ऐकून, जखम पाहून, रामरावांना पुन्हां हुंदका आला. तिच्या खांद्यावर डोकें ठेवून ते रडत बोलूं लागले...

सीता ! मी नीच आहे, पापी आहे, राक्षस आहे...

सीता, तुझी क्षमा मागायला तोंड आहे कां मला ? करशील का कधीतरी क्षमा ?

...इश्श क्षमा कसली मागायची त्यांत ?

सीता—याच पापी हातांनीं मी तुला मारलं,—या नीच पायांनीं तुला लाथा दिल्या—तोडून टाकूं कां हे—मग तरी करशील कां क्षमा ?

...रडूं नये असं वेड्यासारखं—विसरून जायच्या साऱ्या गोष्टी; त्या स्वप्नासारख्याच...

—आठवा बरं मागचे दिवस—किती प्रेम होतं आपलं माझ्यावर ?... ती चंद्राबाई येण्यापूर्वी ! अगदीं तितक्या प्रेमानं राहूं आपण पुन्हां.

देवाचीच करणी ही—नाहीं तर मी अगदीं आशा सोडली होती संसाराची—या दुखण्यांत सोडवावं एकदांचं इथून म्हणून मागत होतें देवाजवळ.

पुनर्मीलित पति-पत्नीच्या पश्चात्ताप आणि प्रेमाच्या अश्रुधारा एक होत होत्या—आणि मागील पाप आणि दुःख यांची स्मृति धुवून काढीत होत्या...

पूर्वेकडे तांबडें फुटलें होतें.

उगवत्या सूर्याच्या कडेचे पहिले समांतर किरण त्यांच्या अंगावर पडले—सीताबाईच्या क्षीण अंगावर रंग ओढून रामराव हंसत हुरूपानें उठले...

हं, हलायचं नाहीं आतां—तिथूनच बोल माझ्याशीं बरी होइपर्यंत—मीच चहा करणार आहे आजचा—आपल्या नव्या आयुष्याची सुरुवात आहे आजपासून—

—सीताबाईनीं हात जोडून उगवत्या सूर्याकडे पाहिलें—

---

# गायिका



रात्रीं दोनचा सुमार असेल.

नाटक सुटल्यावर निर्जन रस्त्यांवरून मी परत जात होतों. खांबावरील दिव्याच्या प्रकाशांत मला तें दृश्य दिसलें.

...धुळीनें माखलेली, निश्चेष्ट अशी ती गायिका अस्ताव्यस्त स्थितींत गटाराच्या कडेशीं पडली होती. तिचें कपाळ फुटलें होतें. सारें अंग जखमी झालें होतें, आणि लुगड्याच्या चिंध्या झाल्या होत्या—"अरेरे! कोणी तरी हृदयशून्य दुष्टानें अत्याचार करून तिला इकडे फेकून दिली असावी. काय अनर्थ हा!" मी उद्गारलों.

एके काळीं हिंदुस्थानांतले सारे रसिक तिच्या अभिजात गाण्यावर मुग्ध झाले होते. 'सारे सारेग' करणाऱ्या संगीताच्या विद्यार्थ्यापासून मोठमोठ्या ख्वांसाहेबापर्यंत तिच्या गाण्याची चहा असे. घरीं, दारीं, रस्त्यांत आबालवृद्ध तिचीं गाणीं गुणगुणत. थेट गौहरजानपासून हिराबाई, सुंदराबाई, व्यास, मास्तर शांतारामपर्यंतच्या गायकांनीं तिच्या गाण्याचें अनुकरण करण्यांत धन्यता मानली होती. अनुकरण, चेष्टा, टीका, विडंबन, यांचाही वर्षाव झाला तरी कितीक वर्षें तिनें रसिकांना डोलविलें होतें. रंगारूपानें मात्र ती फारशी काय बिलकूलच मोहक नव्हती—अगदीं काळीकुळकुळीत आणि बांध्यानें काडीसारखी. परंतु एकदां तिचें गायन सुरू झालें म्हणजे तिच्या तोंडावर कोणाची नजर ठरत नसे. कपड्यांचा मात्र तिला फार शौक. कधीं लाल, कधीं काळें, जांभळें किंवा पिवळें पातळ नेसून ती नृत्यही करी. मऊ मखमली गालिच्यावरून स्पर्श होतो न होतो अशा रीतीनें तिचीं नाजूक पावलें फिरत जात.

बोलून चालून गायिका ती...तिच्या आचरणांबद्दल फारशी चिकित्सा न करणेंच बरें. कितीतरी यजमान केलें होते तिनें. शेवटीं तिच्या पडत्या काळांत आपल्या गाण्याची इतकी कमी किंमत ठरवून ठेविली होती कीं हवे त्यानें तेवढे पैसे मोजावे, आणि खुशाल आपल्या घरीं तिची बैठक ठरवून मन मानेल तितका वेळ तिच्याकडून गाणीं म्हणून ध्यावीं, इतकी ती लाचार झाली होती. त्याचाच हा आजचा शेवट. अरसिकांच्या पाशवी धिंगामस्तीनें तिच्या काळजाचे तुकडे पडत. उर भरून येऊन गाण्याचे सूरही तुटून जात. घशांत आवाज खरखरे, बेसूर होई.

केवळ जगण्यासाठीं हें सारें तिला निमुटपणें सहन करावें लागे. वाढत्या वयाबरोबर, बदलत्या अभिरुचीबरोबर तिच्या गाण्याची लोकप्रियता अगदीं संपत आली होती. हें तिला उघड्या डोळ्यानें पहावें लागत असे.

तिच्या वेळीं जन्म देखील झाला नव्हता, अशा नव्या नव्या नाचऱ्या पोरी रंगी-बेरंगी पातळें नेसून, कोणी साथीदारांच्या वाद्यांच्या गोंगाटावर, कोणी एखाद्या वस्तादानें दिलेल्या चालीवर भराभर पुढें येऊन लोकांच्या तोंडीं गाजत. जिकडे तिकडे त्यांचा बोलबाला होई आणि या बिचाऱ्या वृद्ध गायिकेला आतां कोणीही विचारीत नसत.

सुटली बिचारी—जीवंत विस्मृतीपेक्षां मरण फार बरें.

\+ + +

तिची हालचाल केव्हांच बंद झाली होती. निष्णात डॉक्टरांच्या शुश्रूषेचाही आतां कांहीं उपयोग होणार नव्हता हें मला कळून आलें.

पहाट होईल, लोक जमतील, आणि तिची शेवटली रीतसर व्यवस्था होईल.

एके काळीं साऱ्या रसिकांना वेड लावलेल्या त्या गतप्राण भग्नगात्र गायिकेला शेवटचा प्रणाम करून मी पुढें निघालों.

फाटक्या वेष्टनांत पडलेली “ राधे कृष्ण बोल ” या लोकप्रसिद्ध गायिकेची ती फुटकी तुटकी एक रेकॉर्ड होती ! !

# जिंदगी.



" दादा, एवढं रुपयं घेउन नोट देतां का एक धाची ! "

दर पंधरा दिवसाला रामजी रात्रींच्या वेळीं माझ्याकडे येई, आणि जरा चांचरत--ओशाळत, ठराविक मागणी करी. मात्र त्याचा कंजूषपणा इतका, कीं, मी ती नोट त्याच्या हातावर ठेवल्यावरही रुपये आणण्यासाठीं मलाच शेजारीं त्याच्या बिऱ्हाडाकडे जावें लागे. आंतल्या खोलींत वंशपरंपरा घरांत चालत आलेली, कधीं जागेवरून न हाललेली जर्णि लाकडी पेटी उघडून त्यांतले रुपये थरथरत्या हातानें मोजून तो बाहेर येई आणि माझी बोळवण करी. मीच काय, परंतु प्रत्यक्ष त्याच्या बायकोलाही त्या खोलींत जाण्याची बंदी होती. खोलीच्या कुलुपाची जाडशी किल्ली रामजीनें आपल्या गळ्यांत अडकवून ठेविली होती. एखाद्या काळ्याकुट्ट म्हशीच्या गळ्यांत बांधलेल्या जड लोढण्याप्रमाणें तिचा अवतार दिसे.

अगदीं अक्षरशत्रू असूनही रामजीइतका कुशल सुतार मात्र आमच्या लहानशा गांवांत नव्हता. गेल्या पंधरा वर्षांत बांधल्या गेलेल्या बहुतेक साऱ्या घरांचे कडीपाट, खिडक्या, दारें हें काम रामजीच्या हातांचें.

दररोज संध्याकाळ झाली म्हणजे आपली आंखूड काळीकुट्ट चिलीम भरून रामजी आमच्या ओट्यावर येऊन बसे, आणि विस्तवाची मागणी करी.-' तेवढ्यांत दोन काड्या वांचल्या ' हा विचार त्याच्या मनांत येत असावा. चिलीमीवर जळक्या सुंभाचा पीळ पेटवून खालून ओलें फडकें गुंळाळून मिटल्या डोळ्यांनीं, आणि कलत्या मानेनें आधाशासारखें तो पहिले झुरके मारी--आणि त्या आनंदानें भारावून डुलत बसे. अशा वेळीं मी त्याला अनेकदां म्हणत असे.

" अरे रामजी, किती पैसे मिळवितोस तूं ? आमच्यासारख्या शिकलेल्या मास्तरकी करणाऱ्यालाही दिसत नाहीं तेवढें; पण इतकं असून हा तुझा कंजूषपणा बरा नाहीं बरं. कधीं झुळझुळीत घडोतें दिसलं नाहीं तुझ्या बायकोच्या अंगावर किंवा नवं चिरगूट मुलांच्या अंगावर. तुझा हा एकुलता कोट आणि हें मुंडासं मी दहा वर्षे पाहतों आहे. करतोस तरी काय एवढ्या पैशाचं ?

यावर रामजीचें ठराविक उत्तर असें " दादा हातपाय हालत्यात तोंवर कांहीं तरी मागं टाकाया हवं ... म्हातारपणीं तुकडाबी कोनी देनार नाहीं बसून."

दिवाळी येवो, होळी येवो, त्याच्या घरांत गुळाच्या खड्याखेरीज मिष्टान्न दिसलें नाहीं. काबाडकष्टानें थकून त्याच्या बायकोनें अंथरुण धरलें, पण औषधालाही रामजीच्या पेटींतील एक नोट कमी झाली नाहीं. गांवच्या वैद्यबुवांच्या घरची किरकोळ दुरुस्ती केल्याबद्दल त्यांनीं निष्काळजीपणानें फेंकलेल्या दोन पुड्या हेंच तिचें औषध. एक रात्रीं घाबऱ्याघाबऱ्या मला उठवून त्यानें मात्रा मागितली, पण ती घशाखालीं जाण्याआधींच तिचा जीव त्या क्षीण देहांतून पळाला होता. साऱ्या गांवकऱ्यांचीं बोलणीं, जातींबाहेर टाकण्याच्या धमक्या सोसूनही त्यानें तिच्या नांवचें जात–जेवण घातलें नाहीं.

असेच दिवस चालले. हळूहळू तारुण्य संपलें. उत्साहही ओसरला. मागें न भोगलेलीं, आणि आतां बेचव झालेलीं सुखें मधून मधून त्याला हुरहूर लावीत, आणि तो हळूंच गळ्यांतली किल्ली चांचपूं लागे.

बायकोच्या मृत्यूनंतर पोरांनीं त्याची फार आबाळ केली. " कधीं उलथून जाईल म्हातारा कुनाला ठावं " असें त्याच्या तोंडावर म्हणत. पोरांच्या उद्योगावर तो तुकडे मोडी पण दोन वर्षांत एकदांही त्याच्या गळ्यांतली किल्ली बाहेर निघाली नव्हती.

÷ ÷ ÷

" दादा जरा पघा कीं, बाबा कसंसंच करत्यात " म्हणून एका

[illegible]

लेल्या दम्यानें म्हातारपणीं रामजीचे पुरे हालहाल चालविले होते. मी गेलों तेव्हां तो शेवटल्या घटका मोजीत होता. अजूनही मुलांवर त्याचा विश्वास नव्हता. गळ्यांतली किल्ली काढण्यासाठीं त्याच्या क्षीण हातांची धडपड चालली होती. मी ती किल्ली काढून त्याच्या पुढें ठेविली. त्याचा श्वास जोरांत घशांत घरघरत होता. खुणेनेंच त्यानें मला आपली मोठी पेटी उघडून आंतल्या नोटा आपल्याजवळ ठेवण्यास सांगितलें.

कसाबसा कुशीवर वळून कण्हत तो पेटीकडे पाहूं लागला. तेलाचे थेंब सोडून तें गंजलेलें कुलुप बऱ्याच वेळानें मी कसेंबसें हिसकाहिसकी करून त्याच्या किल्लीनें उघडलें, व तें जड झांकण मागें टाकलें.

...आणि मी एकाएकीं बसल्याबसल्याच मागें कोलमडलों.—एक भला मोठा गलेलठ्ठ उंदीर आपल्या जाड गुळगुळीत निमुळत्या शेपटीचा फटकारा माझ्या तोंडाला मारून पळाला. जन्मभर जतन करून ठेविलेल्या नोटांच्या बारीक तुकड्यांनीं आणि भुग्यानें ती पेटी तोंडोतोंड भरली होती ! ! लालभडक अंगाचीं, लहान लहान उंदरांचीं ओंजळभर पिलें त्या भुग्यांत वळवळत होतीं, व पेटीच्या तळाशीं उंदरांनीं कुरतडून केलेलें एक भलें मोठें भोंक होतें. मान उंचावून हें दृश्य पाहून रामजीनें अगदीं गुरांसारखा हंबरडा फोडला. आम्ही जवळ जातों तोंवर डोळे फिरवून मान मोडून त्याचें लांकूड झालें सुद्धां !

कडकडत्या चितेवर त्याच्या देहाबरोबरच तो ढीगही जाळला गेला. रामजीनें सारें जीवन जाळून केलेली जिंदगी अशा रीतीनें जन्मभर त्याच्या-जवळ निरुपयोगी राहून शेवटीं त्याच्या देहाबरोबरच जळून गेली ! !

---

छापत आहे —

# आधुनिक आङ्ग्ल वाङ्मय

ले० : प्रो. भा. म. गोरे,

एम्. ए. ( फर्ग्युसन कॉलेज, पुणें ).

( माजी फेलो – बडोदा कॉलेज.

इंग्रजीचे अध्यापक – विलिंग्डन कॉलेज,

सांगली १९३२–१९३५. )

[ मराठी भाषेचे ज्येष्ठ आचार्य –

प्रो. श्री. नी. चापेकर

एम्. ए. एल्एल्. बी.

यांच्या विवेचक प्रस्तावनेसह ]

आधुनिक आङ्ग्ल वाङ्मयांतील काव्य, कादंबरी, नाट्य व निबंध या क्षेत्रांतील श्रेष्ठ लेखकांचा रसग्राही पद्धतीनें परिचय करून देणारें हें मराठी वाङ्मयांतील पहिलेंच पुस्तक आहे.

दीडशेंवर पृष्ठें          बारा सुंदर चित्रें.

— चित्रशाळा प्रेस, पुणें २.